॥ श्रीदत्तप्रसन्न ॥

साग्र संगीत

# मंजुभाषिणी नाटक.

अंक १-३.

---

लेखक

कृष्णाजी दामोदर मळेकर.

---

प्रकाशक

गंगाधर भास्कर भावे.

---

मुंबई येथें

"गौरीमनमोहन" छापखान्यांत छापिलें.

१९०६.

"संविधानक चांगलें आहे. प्रवेशाची जुळवाजुळव करतांना रंगभूमीवर प्रयोग चालला असतां येणाऱ्या अड-चणीकडे विशेष लक्ष दिलें आहे. नाटकाचा प्रयोग करण्यास नाटक लहान होईल असें वाटतें. पुष्करास पाहून वीरतनयांतील बकुलाचें स्मरण होतें. एकंदरींत नाटक बरें आहे. एकाद्या नाटक मंडळीनें याचा प्रयोग केल्यास तो लोकाश्रयास पात्र होईल. अशी आशा आहे."

महाराष्ट्र नाट्यसमाज,
पुणें.

---

## विनंती.

पान १९, व ज्या ज्या ठिकाणीं जयगड हा शब्द आला असेल त्या ठिकाणीं राजगड असें वाचावें.

प्रकाशक.

# नाटकांतील पात्रें.

सूत्रधार—नाटकाचार्य.
नटी —सूत्रधाराची स्त्री.
पुष्पसेन—जयपुरचा राजा.
खलराय—पुष्पसेनाचा प्रधान.
पुष्पराज—राजाचा सेनापती.
वीरबाहू—राजाच्या सेनेंतील शूर सरदार.
हंसराज } इतर सरदार.
भुजंगराय
पिऱ्या } मारेकरी.
सटव्या
सदानंद—राजगुरु.
विभांडक } सदानंदाचे शिष्य.
दालभ्या
पुष्कर —राजा पुष्पसेनाचा मुलगा.
पुष्पावती —पुष्पसेनाची स्त्री.
मंजुभाषिणी—वीरबाहूची स्त्री.
शिवाय —दासी, पहारेकरी, वारांगना इ०

॥ श्री दत्तप्रसन्न ॥

साद्य संगीत

# मंजुभाषिणी नाटक.

## मंगलाचरण.

पद ( सांब सुरा भरणा )

ईश पदा नमना । करितों । मग वामन चरणा ॥ धृ ॥ कैलासेशा नत जन संकटीं । धांवुनि यावें गिरिजा रमणा ॥१॥ नाम तुझें गाया । शिणले सुरवर मुनि वाया । होईल कैसें या । बाला । रचितो कवनाया । तोषद होवो सुजन गणा-या । विनती चरणीं रति-पति दहना ॥२॥

पद ( चंद्रे मेहेताव )

पदा नमि गजानना । नत सकल व्यसना विलया सदया न्याया धांवोनीया ॥ धृ ॥ कुंडलीश कटिबंध तनुद्भव गुण-गणमंडित कीर्ति अखंडित। खंड दुरितचय चंड पराक्रम वितंड खंडण स्वजना मंडण। मंगल धामा मंगल नामा । हृदय विरामा । भक्त ललामा । अर्पित कुसुमा । स्मरि तव नामा । धांवोनी या ॥१॥

सूत्र० सांप्रदायानुरुप कार्यारंभीं झालेलें ईशस्तवन पुरें आहे. (मारिषाकडे वळून) एखाद्या नवीन नाटकाचा प्रयोग पहावा या हेतूनें हे सर्व नाट्यकलोत्सुक सभासद आज येथें जमले आहेत या करितां सर्व वेषधरानां नाट्यशाळेंत जमण्यास सांगून सर्व सिद्धता करायाला सांगितली होती त्याप्रमाणें केली आहेस ना ?

(मारिष खुणेनें होय म्हणतो)

( मारिष जातो )

या कामीं आपल्या प्रियेचीही आपणाला मदत घेतली पाहिजे. चतुरिके, अग चतुरिके, तुझ्या स्वामिणीला लौकर बोलावलं आहे म्हणून सांग. हे रसिक सभासद हो—

दिंडी

श्रांत ऱ्हदयातें शांत करायातें ॥
दावितों अजि संगीत नवकृतीतें ॥
असो अवधानचि विनवितों तुम्हातें ॥
मान्य करूनी घ्या सेवुनी गुणांतें ॥१॥

(नटी हातांत फुलांचा हार घेवून प्रवेश करिते .)

नटी—

पद ( बारो प्रीया बेगने )

म्लान हें वदन कां कांता । होई, पडली कसली तुझांस आज अति चिंता ॥धृ॥ गुंफित होतें क्रीडा

भूप बळाग्राणि नाहिं शूर कुणि सर्वहि गेले यमसदनीं॥
सुभट योध बहु नगरीं असती पाठविले कां त्या न
रणीं ॥
कार्य न झालें द्रव्य खर्चुनी मोटें भूपा धुळिं न धणी॥

पुष्पराज—वीरसेनासारख्या बलाढ्य शत्रूस आपला मांडलीक केला, हें कां लहानसं काम झालं? शिवाय याच्या सारखा शूर सरदार तरी कुठं आहे सर्व सैन्यांत!

खल०—हं तुम्हींही लागला कां त्याची स्तुती करायला अहो पराजय कसचा आणि काय कसचं! राजाशीं वीरबाहूच वर्तन प्रामाणिकपणाचं दिसत आहे पण आंतून त्याचा कावा फार निराळा दिसतो. वरकांती वीरसेनानें आपलें स्वामित्व कबूल केलें परंतु आंतून हे दोघे एक असून त्यांचा फार निराळा विचार आहे. हा वीरबाहू दरबारांत आल्यापासून याचचं प्रस्थ वाढत चाललं आहे. सर्व जुने लोक अविचारी, मूर्ख व षंढ आणि हे नवे प्रामाणिक, शहाणे आणि शूर! हीं टरटुर करणारीं राजाच्या प्रीतींतलीं नवीं माणसं स्वतःना प्रतिराजेच समजतात. पुष्पराज आपण जुनीं माणसं कुच कामाचीं बरं! तुमच्यासारख्या ज्या जुन्या माणसांनीं आजवर इमानें इतबारें सेवा केली त्या शुभ्र केसमय डटलटणाऱ्या मूर्तींवर लौकरच कांहींतरी

तोहमत येऊन अर्धचंद्र मिळणार, इतकंच नाहीं, तर या राज्यांतूनहीं त्यास हद्दपार केलं जाणार, अशा-विषयीं मला नक्की बातमी कळली आहे. वीरबाहूनं तुमच्याविषयीं व माझ्याविषयीं राजाच्या मनांत कि-ल्मिष उत्पन्न केलं आहे आणि ही गोष्ट कोणत्या थरावर जाणार याचाही प्रत्यय तुह्माला लौकरच येईल.

पुष्पराज—राजाची वृत्ती पालटायला असं कारण तरी काय झालं?

खल०—कारण तसंच आहे. वीरबाहूची स्त्री मंजुभाषिणी आहेना, तिचं लावण्य पाहून हे महाराज वेडावले आहेत व तिच्या सांठींच या वीरबाहूला जवळ घेऊन त्याच्या कलाप्रमाणें वागत आहेत.

पुष्पराज—अरेरे!! राजा, तुझ्या सद्गुणांची माती व्हायाची वेळ यावी अं-बरं-प्रधानजी याला कांहीं तोड आहे कां हो?

खल०—उपदेशानं किंवा इतर प्रयत्नानं हे काम ता-ळ्यावर येईल असं मला तर वाटत नाहीं.

पुष्पराज—खुद्द राजाच जर असं वर्तन करूं लागला तर मग काय करायचं?

खलराय—राजा जर अन्यायानें वागूं लागला तर प्रजेनं कोणत्या उपयाचं अवलंबन करावं, हे पूर्वींच्या इति-हासावरून स्पष्टपणें दिसत आहे.

पुष्पराज—त्या उपायाचं अवलंबन करणं आपणाला योग्य नाहीं. आपण एकदां उपदेश करून पाहूं.

खलराय —खुळें आहांत झालं, या वर्तनाबद्दल महाराजाच्या कानावर मी एकदां सोडून लाखोंवेळां घातलं आहे परंतु आहे तें आपलं कायमच. हें पहा, मला एक युक्ति सुचली आहे ती अमलांत आणली तर आपलं कल्याण होईल. (जवळ जाऊन कानांत सांगतो ). कां स्तब्धसे ! यांत तुह्माला इतकं कठिण तें काय वाटलं? व्यवस्था सर्व मी करतों पण तुमची कबुली पाहिजे. हें पत्करा किंवा तुरुंगांत बसून शिळे तुकडे खायाचं पत्करा.

पुष्पराज—पण हें काम फार धाडसाचं आहें.

खल०—तें कसंही असो. तुमची कबुली असली ह्मणजे झालं. मी सर्व व्यवस्था करतों.

पुष्पराज—बरं पण—

खल०—त्याची नको हो तुह्माला काळजी. मी आतां त्याच उद्योगाला लागतो. तुह्मी जा.

( पुष्पराज जातो )

हें कुत्रं लौकरच वळलं ह्मणून बरं झालं, आतां मात्र या थेरड्यावर फार नजर ठेवली पाहिजे. आमच्या या कपट नाटकाची नांदी या सूत्रधाराकडून झाली, आतां नाटकाला सुरवात करून अशी गम्मत उडवतो

कीं यंव. या वीरबाहूला कोठडीच दाखविली पाहिजे. राजेसाहेब शिकारीस गेले आहेत त्यांचीही तिकडेच व्यवस्था लावली पाहिजे. (थांबून) आतां पुष्पावती जाते कुठं, आहाहा काय तिचं तें रमणीय स्वरूप!!

पद (प्यारा प्यारा बना बनाजो)

सखि-मुखा प्रती। तमिस्त्रापती। पशूंचा पती! कटी, लाजंती। बघोनीच ती॥ धृ॥ कुरळ केश। बघुनि आशा। मधुप-ततितें। गायनातें, सुटे धरिती। कोकिला मौन ऐकोनी। लाजति पाहोनीया सुंदर रुपा या आदितिज-युवती॥ १॥ लपतसे भुजंग विवरिं सखिचि कबरि पाहुनी। कासारिं हंस लपत तरुण सुदति-गमन देखुनी॥ २॥

खरोखर सुंदर स्त्री विषयीं कवींनीं केलंल हें वर्णन हिला कसं अगदीं योग्य आहे. वीरबाहूला कांहीं तरी युक्तीनं येथून हुसकून लावलं पाहिजे. कुठं तरी भयंकर किल्ल्यावर याची योजना केली पाहिजे. मांग नां चौदावं रत्न व कांचन प्रयोग ह्या दोहींची योजना करून महाराजाचा बंदोबस्त केला पाहिजे.

(भुजंगराय येतो)

भुजंग०—प्रधानजी, महाराजाच्या हुकुमाप्रमाणं मी जाण्याला निघालों आहे

(हंसराज प्रवेश करितो)

खल०—भुजंगराय, तें राहूद्या अगोदर, केवढा भयंकर प्रसंग गुदरला आहे! महाराज शिकारीस गेले आहेत ही संधी साधून त्या वीरबाहूनं महाराजाला अरण्यांत मारण्याचा विचार केला आहे, अशी मला पक्की बातमी कळली आहे. वीरबाहू आजच जयगडाकडे जाणार आहे त्यानें नगर सोडल्या बरोबर त्यास कैद करून तूर्त जयगडाच्या किल्यावरच ठेवा. केवढी दगलबाजी ! परमेश्वरा, केवढा हा भयंकर गुन्हा. जा जा. लौकर.

( भुजंगराय जातो )

या नाटकाचे एक दोन प्रवेश तर पार पडले आतां पुढच्या प्रवेशाला लौकरच सुरवात केली पाहिजे. या प्रमाणें तेही प्रवेश जर सुरळीतपणें पार पडले तर माझ्या सारखा भाग्यवान कुणीच नाहीं. आतां मंजुभाषिणी प्राप्त होण्यासाठीं प्रयत्न चालविला पाहिजे.

पद ( सुकुमार असनि तूं )

ती यास। तों वरी खास । करिन यत्नास। होइ वश अबला! लागला निशिदिनीं ध्यास तिचा बहु मजला ॥ उतरीन। तिचा अभिमान। मारि स्मर बाण। शक्य सहण्याला। नच तिनें लाविलें वेड खचित बहु मजला ॥ १ ॥

( खलराय जातो )

**हंसराज**–( स्वगत ) मी जें कांहीं ऐकलं तें स्वप्नांत तर नाहींना ! ज्याच्या राज्यांत अन्यायाला हद्दपार केलं आहे सौख्य देवतेनं आपलीं क्रीडामंदिर बांधलीं आहेत, त्यां राजाचा वध करण्याचे विचार त्याच्या प्रधानांच्या मनांत यावे अं ! पुष्पावती राणीच्या सौभाग्यमंदिरास आग लावण्याचा विचार करून तिचं पातिव्रत्य भंग करण्याचा विचार करणारा हा कपट मतीचा भोक्ता दुष्कर्म करावयास लावणाऱ्या काममंत्रानें मारलेली कुठार घेवून मंजुभाषिणीच्या पातिव्रत्य तरूचीं पाळं मुळं खणून टाकण्याला सिद्ध झाला अं ! अरे दुष्टा त्या स्त्रियांच्या नांवांचा उच्चार करण्याची तरी तुझी योग्यता आहेका ? पुष्पावती तुझी धनीण तिच्या विषयीं असले भलभलते बिचार–परमेश्वरा, या स्त्रियांचं पातिव्रत्य तूंच रक्षण कर. काय चमत्कार! भुजंगरायास एक थाप वीरबाहूला दुसरी आणि पुष्पर जाल्या तिसरीच, कोणाचा कोणाला मेळ नाहीं. आतां तावडतोब जाऊन जर हा खरा प्रकार भुजंगरायाला कळविला तर त्याला माझं बोलणं मुळींच खर वाटायचं नाहीं. अगोदर अरण्यांत जावून महाराजांच्या सुरक्षितपणाविषयींचा विचार पाहिला पाहिजे. परमेश्वरा माझ्याहातून एवढं कार्य करीवच. आतां महाराज ज्या अरण्यांत शिकारीला गेले आहेत तिकडच जावं. ( निघून जातो )

## प्रवेश तिसरा.

### स्थळ–( जयपूरनगर )

( पुष्पावती महालांत बसली आहे असा पडदा उघडतो )

**पुष्पावती**–पुरुषांना शिकारीचा किति तरि नाद हा! शिकारीहून येवून चार दिवस झाले नसतील, लगेच काल पुन्हां जाणं झालं. एकदां जीव पोळला, तेवढ्यान नाहींकां सावध व्हायूचं! रात्रंदिवस रानांत वस्ती. मेलीं श्वापदं तरी किती असतात तिथं! (धाबरून) नकोग बाई! माझ्या तान्हुल्या वरचा प्रसंग आठवला म्हणजे कसं अगदीं भडभडून येतं! आई अंबाबाई, तूंच त्यांची पाठीराखी आहेस.

(खलराय प्रवेश करतो )

कां प्रधानजी, आज इकडं कुणी कडं ?

**खल०**–आपल्याच भेटीला. रात्रंदिवस आपल्या भेटीची इच्छा करीत आहे, तो आज योग आला.

पद ( पांडु नृपति जनक )

रात्रंदिन सुचत नाहिं । तुजविण मज सौख्य
कांहिं । नाहीं मुळें या देहीं । चित्तहारिणी ॥१॥

**पुष्पा०**–

वारुणि प्राशन केली। काय? तुमचि बुद्धि चळलि।
नीति भीति लाज त्यजिलि। योग्य नच तुम्हां ॥ २

खल०—

या वेदांता आंवरि । अंतरंग मुदित करी । रुप
तुझें भान हरी । चित्तहारिणी ॥३॥

पुष्पा०—

माते सम परस्त्रीतें । मानिति, कां पितरातें ।
पाठविसी नरकातें । लाज धरि मनीं ॥४॥

खल०—

सौंदर्याची खाणी । अससी कौमुदिवदनी ।
नाहिं पुरीं राज्याग्रणि । तोष मोहिनी ॥५॥

पुष्पा०

मूढ षंढ अधम अससी । लाज धरी कां छळिसी ।
प्राप्त न ही तनु तुजसी । सत्य जाण हें ॥६॥

खल०—प्रिये.

पुष्पा०—प्राणनाथाशिवाय प्रिये ह्मणण्याचा कुणालाही अधिकार नाहीं बरं. (खलराय जवळ येतो ).

पुष्पा०—हं. खबरदार पुढं येशील तर. अरे ज्याच्या पदरच अन्न खाऊन असा माजलास त्याच्यावरच उलटलास! धिःक् धिःक् तुझं जिणं चांडाळा डोळे उघड नीट.

पद ( कंठ चरचर चिरुनि )

आंति तव तनु रौरवामाधिं घोर पापी ही पडो ।
करिशि स्पर्शा मम तनुतें हस्त तूझे ते झडो ।

मृत्युनगरीं दुःखदाई, जीभ झडुं, हो यातना ।
दूर हो करि कृष्ण मुख हें आवरी तव कामना ॥१॥

खल०—हं! एवढंचना!!

पद (जनक मजसि मारवी)

नरकिं तनुसि पाठवो कृतांत धर्मराज या ॥ धृ ॥
दुःसह, पूर्वज पडोत, । निरयीं तनुला छळोत । बहुत
कालदूत या ॥ १ ॥ तव तनु-सुख प्राप्ति पुढें नरक
नसे कांहिंच या । सुरवर-गृह गमत सौख्य-तुलनिं
तुच्छ या ॥२॥

पुष्पा०—अरे अधमा, पूर्वज नरकांत पडले तरी हरकत
नाहीं अं !

खल०—प्रिये

पद (कर टाकि सखे)

कां शीण देशि सखये तनुला ॥ धृ ॥ हो मान्य रसें
जगिं सौख्य नसे । जग शून्य दिसे । कां वरिसी नि-
र्दयतेला ॥१॥

पुष्पा०—काळतोंड्या नीच—

पद (क्षण ही नच दवडा)

दावि न वदनाला । ऐशा मजसी रे कुटिला ॥ धृ ॥
निमुटपणें जा त्वदीय वच हें मदीय कर्णाला ॥
करवत नाहीं श्रवण म्हणों जा आपुल्या स्थानाला॥१

खल०—प्रिये, सुंदरी तूं याचा विचार कर. मला झिड-कारून टाकल्याचा तुला पुढं पश्चात्ताप होईल बरं.

पुष्पा०—( पलंगाखलचा खंजीर आणते. ) मेल्या, तूं इथून चालता होतोस कां नाहीं? ( खंजीर दाखवून ) हें पाहिलेस कां?

पद ( ऐकुनि त्याच्या भाषणा )

आपसदा जा दूर या क्षणिं। आपसदा नच प्राप्त कर्दा तनु दूर हो झाणें॥ कां पडलासी आज व्यसनीं कां त्वां आवड धरिली चित्तीं आत्ममथनीं ॥ कां कारिसी वाईट करणी। ऐशी दुष्टा येथुनि सत्वर जा पळोनी ॥१॥

( पुष्पावती खंजीर घेवून खलरायास मारावयास धांवते. खलराय खंजीर पाहून घाबरून पळून जातो. )

( पडदा पडतो )

---

प्रवेश चौथा.

स्थळ (जयपूर नगराबाहेरील एक मार्ग.)

( सटव्या व पिऱ्या प्रवेश करितात )

पिऱ्या०—कायर सटव्या, परधानजीनीं आपनास्नी जो हा हुकुम दिलाया याच काय बिंग हायर? अर असला राजा समद्या तिरभुवनांतबी गवसायचा नाय

अन परधानजी असरं काय सांगत्यात? सटव्या, अक्शी खरं सांग. ह्ये काम करावं कांर? मांग झालो म्हनुन् शान् आपनास्नी पाप, पुन्य, माया, सवृताचा राजा ह्ये कायबी उमगत नाहीं व्हय!!

**सटव्या**–इचार केला झंजी ह्ये काम करावंबी वाटतं, आन नग बी वाटतं. करावं तर पाप लागतया आन न करावं तर पोराबाळासकट मगात लागतया. केलं तर परान वांचुनशान लइ लइ पैका मिळल आन न केलं तर परान बी जात्याल आन पैका बी जाईल. काय कराव काय बी ठरना. ह्ये विचार माझ्या या टाळक्यामंदी कसं अगदीं धिंगाना घालत्यात.

**पिऱ्या**–सटव्या मला असं वाटतया कीं, आपून ह्ये काम करूं नये गड्या.

**सटव्या**-लेकाच्या, करूंनये खरं. पन परधानजी काय झंगाल त्ये सुम्रतयूका? ह्ये काम न करून माघार गेलो तर आपनास्नी उभं जाळूनशान् भर दोन परा आपल्या खोपटावर लेका, इस्तु ठेवत्याल इस्तु!

**मिऱ्या**–कायर, आन् असं केलं तर–हि बग आपुन राजसायबाना सोडूनशान् देऊं आन् ह्या मिळालेल्या पैक्यावर येपार करुन चैनीनं राहूं—

**सटव्या**–तुला काय ल्येका-जगला तरी एकला, आन् मेला तरी बी एकलाच पन माझा दगड्या, माझी कारभारीन, माझी यमुदा ह्यच कसं व्हनार?

**पिऱ्या**–तेस्नी बी घेऊं संग. आतां घराकड जा परत आन् समदी आंवराआंवर करुनशान् तुझ्या मानसास्नी त्या मंगुड्याकड द्ये पाठवून दगड्याबरोबर; अन् तूं बिगि बिगि ये त्या जंगला मंदी. मी बी ह्योरं चालतो हळु हळुं.

**सटव्या**–पिऱ्या, लेका, तुझं डोचकं पन् डोचकं है. लइ इचित्र लेका हें टाळकं. युगत अशी काढलीयासकी बोलायची ताकादच नाहीं कुनाची. न्हाइ तर ह्ये माझं टाळकं येच्या मंदी नासक कांद आन कुजूनशान पडलेल बटाट भरल हायती जनु. बरं जातुया तर मी घराकड (जावयास निघतो.)

**पिऱ्या**–यो लेका सटव्या, जाशील आन् व्हशील तकडच आवाच त्वांड पगुन शान् गुंग. भांडीं बिंडीं काय नग संग घिऊं. नगदां माल, कपड, नवीं मुंडामीं आन् डागेनं इवढंच घे. लेका, जा बिगि बिगि आन् धांवत ये. मी त्या जंगलामंदी तुझी वाट पगत बसतुया

( सटव्या जातो. )

**पिऱ्या**–( स्वगत ) जेस्नी आवा न्हायती, त्ये लइ पुन्यवान् आन् भाग्यवान् बी माझ्या संगटचा ह्यो सटव्या पगा–गुतला कां न्हाइ त्येचा जीव कारभारनींत दिसरं आवा असाची तर यकादी तरनीनान फटाकडी व्होवी ह्या सटव्याची आवा बरीक हाय तशीच ग्वाड--

सटव्या घरामंदी ग्येला कीं तिचा मुखडा पगुनशान् आक्शी गार व्हतुया--दमूनशान् आला तर पाय काय चेपती, पानि काय पिन्यापाई गार देती, शेनी किती नाहीं तर आमचं खतरुड व्हतंना- मेली म्हनुनशान् बेस झालं न्हाइ तर या पिन्याच्या आंगावर मांस राह्यलं नसतं इवलस मांस-यंवर आमचं खतरुड.

पद (या रानीं मध्यें वस्ति)

अस्तुरि नव्हती डाकिन व्होती जन्मु· जन्मिची वैरिन हो ॥

पंधरा रुपयाचं लुगडं व्हत तरि येत नव्हतं तिच्या मनालाहो ॥

पांच रुपयांची चोळी घेतालि तरि नवती तिस पसंत हो ॥

दळण मोलानं देत व्हतो तरि इळवर भाकर नव्हती हो ॥

बायकूचा मुखडा पगुनशान लाजत व्होतं घुवड हो ॥

अशी बायकू वाचुनशानी काय सूख या पिन्यास हो ॥

आतां बिगि बिगि जंगला मंदीच जावं.

(पिन्या जातो)



## प्रवेश पांचवा.

स्थळ—( घोर अरण्य )

( राजा पुष्पसेन शस्त्रहीन असा प्रवेश करतो )

**पुष्पसेन**–याच मार्गावर त्याच वृक्षाखालीं बसलों असतां माझ्या बाळाला वाघांनं ओढून नेलं त्यावेळची आठवण झाली कीं, आंगावर शाहारे उभे राहतात. हल्लीं देखील माझी फारच भयंकर स्थिति झाली आहे. हुजरे चुकले; मीही रस्ता चुकून भटकलों. जवळ शस्त्र कांहीं नाहीं. भुजंगराय मी तेथें नाहीं म्हणून परत नगरांत जाईल. ( इकडे तिकडे पाहून ) अबब केवढाले हें गगन चुंबित वृक्ष! जणुं काय ते आकाशांत जाण्याचे मार्गच. या ठिकाणीं दिवसा सूर्य किरण दृष्टीस पडणें कठीणच. हे वायो, रानांत सांपडलेल्या मजसारख्या प्रवाशांनां कां त्रास देतोस? ही काळोखी रात्र आपल्या किर्र् आवाजानं माझं हृदय दडपीत आहे. बा मेघा, या तुझ्या पटलाखालीं सर्वांस आनंद देणारा जो चंद्र, तो लपून बसला आहे त्याला तूं कशाला आपल्याजवळ थारा देतोस? सोड, सोड, त्याला लौकर.

पद ( कंकण चोंहिकडे )

**यामिनि यामिनि गे प्रतिपाया । भिवविसि मजला कां दावुनिया ॥ धृ ॥ अंबरवासी चपले बाई आंवरि तव गडगडण्यासीया ॥ १ ॥ दुःखामाधें सुख किंचित गमतें बसालें श्वापदें दरिं लपुनीया ॥ २ ॥**

माझा बाल ज्या प्रमाणं वाघाचं भक्ष्य बनला, त्या प्रमाणं तर माझी स्थिति होणार नाहींना ? या शिकारीच्या नादानं माझं किति तरि नुकसान झालं, किति तरी वेळा मला पश्चाताप झाला, पण माझं आहे तें कायमच. अरे पण हें काय ?—

पद ( किति कपटि असत्ति )

**मम वाम नयन हा लवुनी ॥ धृ॥ दुश्चिन्हांतें सुचवी, धिंवसा मनसा धरि या न गणि ॥ १ ॥ पाषाणासम कठिण होइ तू किंतु सकल दे त्यजुनि ॥ २ ॥ दुश्चिन्हांतें देइं पाठवळ कृष्णवसन-धर रजनि ॥ ३ ॥**

( पुष्पसेन जातो )

( पिऱ्या प्रवेश करितो )

**पिऱ्या**—अब-ब-ब-ब-ब-ब ! ! काय इचिभन हा काळुख. हथ वाट बी उमगना. नग नग नग नग हे आतां चालनं, त्ये राजाला सोडावनं, आन् तें सोनं, आन् सटव्याचं बिगि बिगि येनं. त्यो मुरदाडिचा मास्नि बिगि येतो, हं आलुच, व्हो छोर, असं छंगाला आन् आजुनपारबी आला न्हाइ. तवा मला वाटतया, कीं, ह्यानं आवा पोर संगट घेवुनशान् हांकला वाट्या. ह्येनं मारलीया मला हंग येतो छनुनशान् थाप, आन् इतका वाडुळ वाट पगतुया पन तकडच झालाया गडाप काय इचिभन चमकृतार हाय ? या दुनयेमंदी

खरं बोलणार लै लइ कवाचित्. समदी दुनया लबाडाची झालीया. न्हाइ तर त्येची ती फटाकडी आवा झंगाली असल, नका जाऊ झनुनशान, आन् ह्यो मरद बसला असल तथच गुंग व्हवुनशान बरं, यइल तवा येल. तवर या जंगलामंदी हकड तकड पगाव कांहीं तरी. राजसाहब हथ असन लइ असक. त्येच्या शिकारीच्या रानाचा ह्योच रस्ता हाय, आन् ती वाट बी मला ठाव हाय.; पन् अजू चदुरदय व्हइना. चांद वर येस्तोर हतंच डुकली उलिशि घ्यवी.

( पिऱ्या निजतो )

( हंसराज प्रवेश करतो )

**हंसराज**–सेवकांनीं सांगितल्याप्रमाणं हें रान आहे खरं भयंकर ! पण या ठिकाणीं महाराज कुठं सांपडणार? या वेळेस ही काळोखी रात्र फार घातुक आहे. लौकर चंद्रोदय होईल तर बरं होईल. चंद्रोदय होईपर्यंत कुठच्यातरी झाडाखालीं बसावं. (हंसराज जातो)

( पुष्पसेन प्रवेश करतो ).

**पुष्पसेन**-आतां, इतक्यांत मनुष्याच्या चाहुलीचा भास झाला असं वाटतं या भयंकर अरण्यांत माझ्याचसारखे मार्ग चुकलेले कोणी असतील बिचारे. चंद्रोदय होईपर्यंत कुठ तरी झाडाखाली बसावं. ( मार्ग शोधीत निघून जातो )

( सटव्या प्रवेश करतो )

**सटव्या**–अर-र-र र-र काय हा कुट्ट काळुख वाट बी उमगना हथं –पिऱ्या बंगाला. याच वाटनं नीट समूर यायचं, पन वाटच उमगना आन् यायाचं कसं ?– ( शीळ घालतो, व चकमक झाडतो ) ( दूर कोणाला पाहिल्यसं करून ) पिऱ्या, आलुरं आलूं. वइच दमधर लेका. उभा न्हाशिल कां न्हाइ.

( पिऱ्या ओंपेंतून उठतो )

**पिऱ्या**–इच्या भनीचामी सटव्या वसव अजून येतुया.

**सटव्या**–आलंना पिऱ्या

**पिऱ्या**–सटव्या, मला वाटलं तूं आतां न्हाइ येत.

**सटव्या**–पिऱ्या, असं कधीं व्हइल कां ? आर लानपन-पासन तमी आमी लंगुट मैतर, आन् ह्यो सटव्या ऐन वक्ती दगा दिइल व्हय ?

**पिऱ्या**–वइच हथ उभ राहा. ते तथं कुनि मानुस दिसतं या कार ? ( इकडे तिकडे फिरतात )

**सटव्या**–क्वान तरी निजल्यावानी दिसतया खरं.

( पुष्पराज पुढें व मागाहून हंसराज असे येतात. )

**पिऱ्या**–हीं पग लेका घावली सिकार. ( सटव्यास ओं-वळतो ).

**सटव्या**–ए कांदिच्या, अर मी ना तो.

**पुष्पसेन**—घटकाभर या झाडाखालींच बसून विश्रांती घ्यावी

( पुष्पसेन खालीं बसतो. )

**पिऱ्या**—अर इच्या भन सटव्या ते पग कोन बसलया, चल चल चल हान, उडव,

(पिऱ्या व सटव्या तरवार उगारून राजाजवळ येतात व मागाहून हंसराज येतो )

**सटव्या**—ए मानसा, कुनिकडं चालला हाइस ?

**पुष्पसेन**—बाबांनो, मी वाट चुकून कुणीकडे आलों, हें माझें मलाच समजत नाहीं. तुमच्या या भयंकर आकृतिवरून तुम्ही दरोडेखोर आहांत हें मी जाणतो, पण माझ्याजवळ या वस्त्राशिवाय कांहीं नाहीं.

**सटव्या**—अर तुझीं कांबरुण नग आन पैका बी नग. आमी तुम्नां ठार मारनार.

**पुष्पसेन**—बाबांनों—

**पद** (नच सौख्य मजला)

**कां चालवीतां अशनी। बाया मजवर या विपिनीं ॥**
**धृ ॥ दोष नाहिं मम कांहीं कारितो विनती या चरणीं**
**मद्वध करुनी नच निर्वाणीं मज द्या सोडोनी ॥१॥**

बाबांनों, मी जयपूर नगरचा राजा आहे. शिकारीस आलों असतांना रस्ता चुकून कुणीकडे आलों, हे मला कळत नाहीं. माझ्या नगराची वाट दाखवून

मला नगरांत पोहोंचवल्यास मी तुम्हांला चांगलं इनाम देईन.

**सटव्या**–गय डोकी ठेव लेका.

**पिऱ्या**–अरं, ईंकती घाई कां? ए मानसा, तें काय त्री चालणार न्हाई. आमी तुस्नी मारनार.

**पुष्पसेन**–बाबांनों, तुह्मी मला मारणारच तर अंतकाळीं परमेश्वराचं नांव तरी घेवूं द्या.

**पिऱ्या**–हं घे परमेसुराचं नांव. आमी बुलिसा दम खातो

**पुष्पसेन**–हे परमेश्वरा, माझा कांहीं अपराध नसता हे दुष्ट मला मारीत आहेत. त्यांत तुला न्याय वाटतो का? हे अरण्यांतील देवतांनों, तुमच्या देखत हा अन्याय चालला असतां तो तुम्हाला खपतो तरी कसा? असा मी कोणता अपराध केला आहे?

पद (क्या सोहाये)

**प्रभो असा कां प्रसंग मजवरी ॥ धृ ॥ मी यांचा अपराध असा कां केला आहे पाहि कांहिं तरि ॥ १ ॥ वेल्हाळी ऐकुनि मम निधना जाइल बुडुनी शोक सागरीं ॥२॥**

माझ्या मरणाचं वृत्त ऐकल्यावर, माझी प्रिया गाई सारखा हंबरडा फोडून सर्व वस्तूंचा त्याग करून ज्या प्रवासाहून कोणताही प्रवासी माघारा आला

नाहीं, अशा प्रवासाला निघून जाईल. प्रिये, तुझी व माझी ती शेवटची भेट असेल, असं स्वप्नीं तरी आलं होतं कां?

पिऱ्या–अर, आटपला कां न्हाई तुझा परमेसुर!

पुष्पसेन–बाबांनों, मी आतां मरण्याला तयार आहे.

पद (पातक महिवर)

कामारि प्रभुवर वंदीत पाय ॥ धृ ॥
अधमाधम हे मज मारीती घोर वनीं या हाय ॥१॥
करुणा तव अंतरिची कैसी लोपुनि या क्षणिं जाय ॥२॥ हिमांशु-धरणा गौरीरमणा मृत्युंजय शिवराय ॥ ३ ॥ (मान पुढें करतो) हं. चालूं द्या.

(पिऱ्या व सटव्या लोटांगण घालतात व हंसराज ही मुजरा करून दूर उभा राहतो. चकमक झाडून उजेड करितात.)

पुष्पसेन–अरे हा वेळपर्यंत तुह्मीं मला मारायला तयार झाला होता आणि आतां मला लोटांगण घालून महाराज ह्मणतां! आहे काय हा चमत्कार!!

हंसराज–महाराज जे, एकनिष्ट ते एकनिष्टच. हे जातीचे मांग असून यांच्या ठायीं जी स्वामिनिष्टा आहे ती फारच थोड्यांच्या ठायीं आहे. मी आपला सेवक हंसराज आहे. आपणांवर नुकताच जो भयंकर

प्रसंग गुदरला होता, त्याला कारण आपले प्रधान खलराय होत. वीरबाहूचा दरबारांत होत असलेला उत्कर्ष सहन न होवून त्याला राजगडच्या भयंकर किल्लयावर बंदींत ठेवून ह्या मांगांची आपल्याला मारण्याकडे योजना झाली होती. या सर्व कृत्याला आपल्या दरबारांतील वृद्ध पुष्पराज यांचं पूर्ण पाठबळ आहे. या वेळीं नगरांत जाणं फार धोक्याचं आहे. आपण हा वेष टाकून अन्य वेषानं कुठं तरी दूर रहावं असं मला वाटतं. चंद्रोदय होण्याचा समय अगदीं जवळ येत चालला आहे. चंद्रोदय झाल्यावर हा भयंकर मार्ग सोडून चांगल्या रस्त्याला लागूं.

**पिऱ्या**–म्हाराज, आमी बी तुमच्या संगुट येनार.

**पुष्पसेन**–अरे, तुमच्या बायका मुलांची काय वाट?

**पिऱ्या**–मस्नी बायक न्हाई, प्वार नाहीं. योकला मोट. या सटव्याला योक आवा, योक पाऱ्या, आन् योक पोरगी बी हाय, तीं समदीं नगरामंदा नायतीं त्या मंगुळ्याला हायतीं. आमाला ते शेर बी नग पगनं आतां. आपल्या पायापय आपली चाकरी करूनशान् ऱ्हावूं.

**पुष्पसेन**–बरं, तुमच्या मनांत माझ्याबरोबर यायचं आहे तर चला. पण सटव्या तूं जा आपल्या बायका मुलां कडे. मला तर आतां असं वाटतं कीं:—

साकी

तापसि वेष अन्य प्रदेशीं गुप्तपणें हिंडावें ।
होइल अनुकूल काल समयिं ज्या नगरासी परतावें ।
इच्छा ईशाची । नचले गति मुळिं मनुजाची ॥ १ ॥

अंक १ ला समाप्त.

# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

स्थळ – जयपूर नगरांतील एक मार्ग.

**भुजंगराय**–यांचीं काय काय कारस्थानं चाललेलीं असतात हें कांहींच कळत नाहीं. महाराजानीं शिकारीस जातांना मला पाठवून देण्याविषयीं सांगितलं असून प्रधानजी मला भलतीकडेसच पाठवितात. (विचार करून) राजानिष्ठ वीरबाहूच्या मनांत राजाला मारण्याविषयींची कल्पना कधीं तरी येईल कां? अशक्य! अगदींच असंभवनीय!! बरं वीरबाहूला कैद करण्यासाठीं मला पाठविलं असतां मागाहून पुष्पराजाकडं ती कामगिरी सोंपविण्यांत कोणता मतलब होता? यांत कांहीं तरी कपट कारस्थान आहे हेंच खरं. (इकडे तिकडे पाहून) अरे, मी तर वीरबाहूच्या वाड्याजवळच आलों. आतां मंजुभाषिणीबाईला हा मजकूर कळवूं. नंतर कुठं जायाचं वगैरेचा विचार.

## प्रवेश दुसरा.

स्थळ ( जयपूर नगर )

( मंजुभाषिणी महालांत तोंडानें खालील गाणें ह्मणत आहे व हातानें विण-काम करीत आहे असा पडदा उघडतो, )

पद ( बायकांच्या गाण्याचे चालीवर )

भंगिलें धनुष्य श्रीरामें वरिलें मला । वनिं आलों उभयतां बाई । कांचनी मृग पाहिला ॥ १ ॥ मानिं वाटे मृग चुकला गे कांचोळिला । पुरवावि हौस ही माझी मम वचनीं राघव गेला ॥ १ ॥ दुर्वाक्य धरुनि मानें छळिल भाऊजिशीं । हें पाप साजणि मी अंगीं । भोगितें दिवसानिशीं ॥ ३ ॥ मुद्रिके राम टाकून आलिस तूं कशी । हा वृतांत सांग मज बाई । सोडी मौन्य बोल तूं मशीं ॥ ४ ॥

परवां लढाईहून येणं झालं नाहीं तोंच पुन्हां लढाईला जाणं झालं. नेहमी कसल्या लढाया होतात.

पद ( बायकांच्या चालीवर गाण्याचे )

पारिजातका निमित्त भामा रुसली श्रीहरिवरी । तिला ग समजावी नानापरी ॥ गुंफुनिया निज हस्तें वेणी काजळ कुंकू करी । ल्यावया अलंकार परोपरी ॥

( इतक्यात भुजंगराय प्रवेश करतो )

**मंजुभाषिणी**—या भुजंगराय, तुह्मी लढाईवर गेला होतांना तिकडची प्रकृति चांगली आहना ?

**भुजंगराय**—कसची लढाई न कसची प्रकृति ! दुर्दैव तुमचं न आमचं.

**मंजु०**—काय ह्मणतां हें ? नीट स्पष्ट सांगा कायते तिकडं जबर जखम नाहींना झाली ?

**भुजंग०**—या हतभाग्याच्या कपाळीं हें वाईट अती वाईट वृत्त सांगण्याचं आलं ! बाई गेला, प्रजेचं पालन करणारा नाहींसा झाला आपल्या राजाधिराज पुष्पसेन महाराजाचा आपणा सर्वांस कायमचा वियोग झाला.

**मंजु०**—काय ह्मणतां तरि काय हें तुह्मा ?

**भुजंग०**—महाराज अरण्यांत शिकारीस गेले आहेत ही संधी पाहून या दुष्ट प्रधानानं त्याना मारण्याकरितां कांहीं चांडाळांची योजना केली आहे ही पक्की बातमी मला कळली आहे. आपल्या पतीची योजना राजगडच्या भयंकर किल्ल्यावरील तुरुंगांत झाली आहे लढाई कसची न काय कसचें ! सर्व अंदाधुंदीचा कारभार ! राजगडचा किल्ला तर इतका भयंकर आहे कीं—

**मंजु०**—पुरे पुरे आतां ती सर्व हकिकत—भुजंगराय, तुह्मीं आतां ताबडतोब अरण्यांत जावून कराना तेवढा तपास. महाराज खरोखरच मारले गेले कीं काय,

त्यानां मारण्यांत याचा काय हेतू वगैरे गोष्टीचा तपास गुप्तपणानं करा अं: आतां राजगडाला जाण्याचा माझा विचार आहे.

भुजंग०—बरं, मी आतां आपली रजा घेतों.

( भुजंगराय जातो ).

मंजु०—प्राणनाथा, आपली मुक्तता करण्यासाठीं मी निघालेंच. ( थांबून ) पुष्पावतीला ही हकीकत कळवूं कशी ? ऐकल्यावर तिची काय स्थिती होईल? काय मेला उलट्या काळजाचा! मागच्या लढाईत जय प्राप्त झाला हें सहन न होवून बंदींत टाकण्याची युक्ती यानं काढली दुसरं काय ( खलराय प्रवेश करतो ) ( कपाळास आंठ्या घालून स्वतःशीं ) कशाला आला कोण जाण. मेल्या तुझा सत्यानास होवो. ( उघड ) प्रधानजी लढाई कडली कांहीं खबर कळली कां?

खलराय–तिकडची खबर! वीरबाहू विजयी होवून परत येणार हें ठरलेलंच.

मंजु०—खरंच कारागृहांतील ढेंकणाबरोबर चाललेल्या लढाईत खरोखरच ते विजयी होवून येणार.

खल०—( स्वगत ) इतक्यांतच ही बातमी इला कशी कळली? ( उघड ) तसं झाल्याचं मला देखील कळलं आहे पण तुला—

मंजु०—मला काय?

खल०—शत्रूनीं कपट करून त्याला कैद करून ठेवलं त्याला माझा नाइलाज आहे.

मंजु०—हो. शत्रूनीं त्यांना कैदेंत घातलं ही गोष्ट खरी आहे. पण हे शत्रू कोण? तुह्मी स्वतःचना—तुह्मीच त्याना बंदींत टाकलं तेव्हां तुह्मी मुक्तता कशी कराल आणि इतक्या कपट युक्त्या रचून जो हा व्यूह आरंभला तो त्यानां सोडण्यासाठीं कीं काय?

खल०—बर तसं कां होईना? मी कैदेत ठेवलं. कैदेंत ठेवण्याचं जसं माझ्या हातांत होतं त्याप्रमाणंच त्याला मुक्त करण्याचं ही माझ्याच हातांत आहे. ती त्याची मुक्तता होण्यास एक तोड आहे.

मंजु०—सांगा पाहूं कोणती ती.

खल०—

पद ( नरकिं तनुसि )

अदय, मदन-पूर्ततेस, ताप देइ, तूं करी ॥ ध्रु० ॥
दर्पक-मार्गण छळिती ।

मंजु०—

दुष्ट तव रसना ती । गळो, जिभेस आंवरी ॥१॥

खल०—

हरण त्रास सुंदरांगि । मम करि हा वल्लभांगि ।
तनु मम अति मदन-छळणिं त्रासली खरी ॥२॥

**मंजु०**–हीचना तुझी तोड. पातिव्रत्याचा भंग करून जग भर दुष्कीर्तीचा डंका मिरविण्यापेक्षां प्राणनाथ जन्मभर कारागृहांत राहिले तरी हरकत नाहीं. अरे चांडाळा.

**खल०**–वाटेल तें बोल. चांडाळ ह्मण, मांग ह्मण, वाटेल ते ह्मण मला त्याचं कांहींच दुःख नाहीं. माझं सगळं सुख तुझ्याजवळ गुतून पडलं आहे.

पद (ताल दादरा.)

मजसि जगिं जरी सखे नुरे तनूस तदिय सौख्य अंतरे ॥ ध्रु ॥ अशन शयन यान पान । सौख्य असुख जीव मरण । विपिन सदन सम समान गमत या खरें ॥१॥ प्रेमांकुस त्यजुनि त्वदिय । मीन रूपें मदिय हृदय लवभरि तरि धरिल शांति कां बरें ॥ २ ॥

**मंजु०**–अरे निर्लज्जा, कांहीं लाज धर

पद (मूढमते तूं पापराशी)

नीच नरा या दीन स्त्रीला । लाज जरा, कां छळिशि खरा, धरि या मनाला ॥ ठेवुनिया बंधनी पतीला । पाहुनि येशी मंदिरि कुटिला एकलीला ॥ वांचायाची आस तुजला । रंका, तूं जरि असेल तरि करिं पलायनाला ॥ १ ॥

**खल०**—

पद (मेरा गमका तराना)

मम मानस हरणी सौंदर्य-खाणी मंजुभाषिणी । तव नाम स्मरणीं कुंजर-समगमनी चित्त हारिणी ॥ धृ ॥ गुंगलों मनीं, निकट येवुनी मन्मनमोहिनी । तोषित्र सुकलों, तुजला विनितों, लागुनिया जपणी । मशिं हास्या करोनी प्रेमा दावोनी बोल मोहिनी ॥१॥

मंजु०–

पद (तकदीर हमारि)

जळो गळोत कर गळोत जीभ पतन हो । रडो रडोच झोड पडो विकल विकल हो ॥ धृ ॥ तूर्ण पूर्ण, नाश निरय तुजसि प्राप्त हो । वपुसि व्रण पडोत अतिं तुज न सौख्य हो ॥ १ ॥

खल०–माझ्या ह्मणण्याप्रमाणं वागलीस तर वीरबाहू जिवंत राहून त्याची मुक्तता होईल ; पण तूं जर असा माझा धिःकार केलास तर तुझी सौभाग्य इमारत ढांसळा यला एक क्षणही लागणार नाहीं.

मंजु०–हं एवढंचना. त्यांची निंदाकर, त्यांना हाल हाल करून मार, त्यांच्या जीविता विषयीं वाटेल ती भीती मला घाल त्याला मी मुळींच जुमानीत नाहीं. माझ्या अंगाला स्पर्श केलास कीं प्राणाला मुकलासच. अरे पतीची कारागृहांतून मुक्तता होण्यासाठीं ज्याला हा देह प्रथम सर्वस्वी अर्पण केला त्या देहाला दुस-

त्याचा स्पर्श होवूं देवून त्याज्य गोष्टीचा अंगिकार करून जिवंत राहण्यापेक्षां व या जगांत अपमानकारक प्रसंग पाहण्यापेक्षां पतीची जी दशा होईल तीच उत्तम असें मी समजतें. जा, त्यांचे वाटेल तें हाल कर. माझ्या सौभाग्य-इमारतीस तूं ढांसळणार होय. थांब तुझ्याच स्त्रीची अगोदर ढांसळून टाकते-पण नको-विनाकारण तुझ्या रक्ताचा या हाताला विटाळ होईल जा, आलास तसा मुकाट्यानें जा.

खल०.–मंजुभाषिणी, तूं किती अविचार करीत आहेस याचा विचार कर. या वेळेस जर मी कांहीं मनांत आणलं तर येईल कां कोणी तुला सोडवायाला.

मंजु०–मला सोडवायला यायाला दुसरं कुणी नको. माझी मी खंबीर आहे. ( आंत जावून खंजीर आणते ) ये ये जवळ ये-चांडाळा–

पद ( वृथा जन्मुनी मजासि )

सिद्ध तूं होसि करण्यासि कां पाप हें । कज्जलासम तुझें मुख करी हें ॥ दुरि, धरी अंतरीं लाज कांहीं, मला । एकली पाहुनी छळिसि कां रे ॥ निकट येशील जरि निर्भयें जंबियें । करिन प्राणांत मी समज मानीं हें ॥ १ ॥

( जंबिया उगारते व मारावयास धांवते इतक्यांत

खलाराय धांदलीनें पळून जातो ). मेल्या, पळून गेलास झणून वांचलास. कायबाई भयंकर कृत्य हें ! मेल्याला कुत्र्या निपट बोललें पण कांहीं लाज ! ( विचार करून ) राजगडच्या किल्ल्यावर जाण्याचा मी विचार केला पण मी एकटी कशी जाणार तिथ–या कामीं पुष्पावतीचा विचार घ्यावा हेंच बरं

पद ( सुंदर रमणीचा )

जगदंबे मजला । बल दे कांत–मोचनाला ॥ ध्रु० ॥
वीरासम दे धैर्य, कार्य हें दुष्कर, पूर्णपणें । ताडिला नेई कामिनि छळिल्या नगरीं दुस्मानें । कां नच कींव न ये तुजला ॥ १ ॥ ( जाते )

( पडदा पडतो )

---

### प्रवेश तिसरा.

स्थळ–( मांदारवन )

विभांडक–पुष्करा, तूं कोणकोणतीं फुलें वेंचलींस पाहूं ?

पुष्कर–हीं बघ–

पद ( तुजे मेरी कसम )

जुइ धवल वर्ण मृदु गुलाब विकसित कमळें ॥ ध्रु० ॥
मोगरा जाइ बकुळीचीं गिरिवरी बिल्वपत्रें आणा–वयासी चला जावुं या सगळे ॥ १ ॥

दालभ्य–अरे आमचे पाय आतां दुखायला लागले.

पुष्कर–बरं तुह्मी इथं बसा मी आतां फुलं व बिल्व घेऊन येतों. ( जातो )

दालभ्य–विभांडका, पोर फारच चपळ; घटकाभर पाय ठिकाणावर नाहीं. हो, बरी आठवण झाली. आतां लौकरच आपणाला सुटी मिळणार आहे तेव्हां तूं आईबापाला भेटायला येशील कां ! मी जाणार आहे. म्हणून विचारतों.

विभांडक–मला या पुष्कराशिवाय चैन नाहीं पडायचं,

दालभ्य–अरे पण तो कुठं इथं राहणार आहे तो नाहीं कां आपल्या घरी जाणार ?

विभांडक–दालभ्या तुला याचा जन्मवृत्तांत माहीत नाहीं असं वाटतं. आपले गुरुजी एक दिवस स्नानासाठीं पुष्करतीर्थावर गेले होते. परत येत असतां एक वाघ या पोराला तोंडांत धरून पळत चालला होता असें गुरुजींनीं पाहिलें, त्यांनीं मोठ्यानें ओरडून गोंगाट केला त्यासरसी वाघ मुलाला ठेवून पळून गेला. नंतर गुरुजींनीं याला आश्रमांत आणून याचं लालन पालन केलं; हा त्या पुष्कर तीर्थाजवळ सांपडला ह्मणूनच याचं नांव पुष्कर असं ठेविलं आहे.

दालभ्य–याला आपल्यासारखा वेद कां नाहीं शिकवीत !

विभांडक–अरे हा जसजसा मोठा होत चालला तसतसे याचे क्षात्र कुलास योग्य असे गुण चमकूं लागले. गुरुजींची हा क्षात्र बिजाचाच आहे अशी खात्री झाल्यावरून त्यांनीं याला धनुर्विद्या शिकवण्यास आरंभ केला.

दालभ्य–तो पहा फुलं घेऊन पळत येत आहे.

( पुष्कर हातांत फुलें आहेत असा धांवत प्रवेश करतो )

पद

दिनकर माध्यान्हा । आला बहु झालीं कुसुमें गृहिं जावूं सत्वर ॥ धृ ॥ ' यावें मुलांनों झणिं ' गुरुनीं कथिलें वच विस्मरलें मनीं कोपले असातिल फार । विलंब होइल शिव पूजेला गुरुजीच्या आजि फार ह्मणुनी या या जावूं सदना झडकर ॥ १ ॥

( तिघे जातात )

---

## प्रवेश चौथा.

### स्थळ–( जयपूरनगर )

पुष्पावती व दासी बसल्या आहेत असा पडदा उघडतो. )

पुष्पावती–आजपर्यंत शिकारीला किती तरी वेळ जाणं झालं पण असं विपरीत कधींच झालं नव्हतं.

या शिकारीच्या नादानं थोडंका अनहित झालं पण सोडून देणं होईल तर शपथ–

( मंजुभाषिणी खालील पद म्हणत प्रवेश करते ).

मंजुभाषिणीः–

पद ( सवाई शिकंदर )

उवगुनि त्रासा वाटे मनसा घ्यावा कीं हा जीव ।
गांजियला अति नारी व्रज ये देवा कां नच कींव ॥
खळ नरि–मंदिरिं शिरती लज्जा सोडोनीया ती ।
मगध देवता अंध जहाली फार गमे भीती ॥ पुंड
यहू हे बंड करीती दचक नसे यांना । अक्षम आतां
वाली कोणी नाहीं युवतींना ॥ १ ॥

पुष्पावती–अग स्पष्ट कायतें सांग–बैस इथं अगोदर–

मंजू०–माझं कपाळ सांगू तुला. अग दुष्कृत्याचे प्रचंड ढीग घालून नाचत आहेत. त्या मेरयाच्या नांवाचा विटाळ देखील नको माझ्या जिभेला.

पुष्पा०–आपल्या प्रधानजीवर ही लाखोली असेल.

मंजु०–हो हो तोच चांडाळ वरं–

पद ( पडतां वेणू रव कानीं )

बसलें असतां मी सदनीं । कपटी येई त्या स्थानीं ॥
प्रथम वदे मज सद्वचनीं । नंतर बोले त्या मदनीं ॥
तर्जनिलें त्या त्याचक्षणीं । लज्जा कंचुक सोडानी ॥

संपर्कास्तव येई पुढती । काढियली मी पतिसदसी ॥
मागें मागें मी सरुनी । जाई लागे तो चरणीं ॥ १ ॥

मेला पळुन गेलाग नाहींतर तिथंच त्याचा मोक्ष केला असतां.

पुष्पा०–सखे तुझ्याप्रमाणंच माझ्यावरही प्रसंग आला होता परंतु माझं भाग्य ह्मणून मी त्या चांडाळाच्या हातून सुटलें.

मंजु०–कैदेंत ठेवलं आहे त्यांना राजगडावर आणिक मी काय सांगूं–सखे तूं आकाश पाताळ एक करून सोडशील.

पुष्पा०–तिकडच्या जिवाला कांहीं अपायविपाय तर नाहींना झाला ?

मंजु०–

पद ( दुःसह स्थिति )

नृपती सुपरम भुवनीं सौख्यें आहे कथुं मी काय ।
दर्शन आशावाय । कारण आहे खल खलराय ॥
॥ धृ० ॥ श्वपचा कडुनी धरणीधीशा । मारविलेंसें धरिलि कुआशा । राज्यासन मिळण्यातें वधिलें भूपा कथुं मी काय ॥ १ ॥

( पुष्पावती मूर्च्छित होते व मंजुभाषिणी तीस वारा घालते. )

पुष्पा०—

पद ( मदिय जनक )

नाथ स्वर्गी जाति कसे मजसि टाकुनी । वांचुनिया सार्थक जगिं काय ? पापिणी ॥ ध्रु० ॥ व्याघ्रानें नेलें वनिं बाळ तान्हुलें । पूर्वजन्मिं पातक मी बहुत करियलें । ह्मणुनि ईश पाप-फळें देइं धाडुनी ॥ १ ॥

प्राणनाथा या दासीवर रागावून एकटेचहो कां गेला ? दम धरा, मीही येतें तुमच्या बरोबर. अरे चांडाळा प्रधाना कायरे ही तुझी अचाट करणी !

मंजू०—

पद ( रामकरीं जरि )

गिळुनी टाकी या दुःखातें । आंवरिं आतां या शोकातें । भाळीं लिहिलें जें ते नियतें । टळत ना विधिला ॥ १ ॥ त्राहि त्राहि करूं त्या दुष्टातें । छळिलें ज्यानें आपुल्या पतितें । धरि मानासिं सखये धैर्यातें । खल-सूडा घ्याया ॥ २ ॥

पुष्पा०—सूड घेवून आतां काय करायचय मीच त्यांच्या भेटीला जानें ह्मणजे झालं—

( पुष्पावती आंगठी तोंडांत घालते इतक्यांत मंजुभाषिणी हात धरते )

मंजू०–गडे हें काय करते आहेस तूं ? सोड–

पद ( हरिलें मन्मन तव )

करुनीया गे निज-हत्येतें । करिशी कां तूं या दुरितातें । आंवरोनि धरि या शोकातें । दाविल ईश सुवासर तूंतें ॥ धृ० ॥

पुष्पा०–

तोडियलें सौभाग्य तरुतें । व्यर्थ भार मम या धरणीतें । पाहिन स्वर्गीं मी सुदिनातें । वांचुनि काय जगीं फळ मातें ॥ १ ॥

( हंसराज प्रवेश करतो )

हंसराज–आपल्या परवानगीशिवाय मी आंत आलों याबद्दल आपण मला क्षमा कराल अशी आशा आहे या एकंदर चिन्हांवरून मी एक क्षणभर जर उशीरा आलो असतों तर भयंकर प्रसंग गुदरला असतां; व ही अशी वेळ येणार हें मी कळून चुकलों होतो राजेसाहेबांच्या मृत्यूची बातमी अक्षरशः खरी होती परंतु परमेश्वराच्या कृपेनें व आपल्या पातिव्रत्य प्रभावानें त्यांना सुरक्षित ठेवलें आहे. ते हल्लीं वेषांतर करून फिरत आहेत.

पुष्पा०–( त्याला आपल्या गळ्यांतील हार देवून ) हे घ्या तुम्हाला बक्षीस आज तुम्ही मोठी आनंदाची वार्ता सांगितलीत.

हंस०—स्वामीसेवेबद्दल बक्षिस घेणं हें आमचं कर्तव्य नाहीं. महाराजांची प्रामाणिक पणानं चाकरी बजा-वणं हीच आमची खरी कर्तव्यता व स्वामीची आह्मां गरीब चाकरावर पूर्ण कृपादृष्टि आणि विश्वास हेंच आमचं इनाम. स्वामीचा जीव तो आमचा जीव. स्वामीच्या सेवेंतच आह्मांला धन्यता वा.ते. जों पर्यंत धन्याजवळ विपुलता आहे तों पर्यंत त्याची चाकरी बजावणं व हीन कालीं त्यास विसरून जाणं ही सेवकाचीं लक्षणं नव्हत. स्वतःच्या प्राणाची पर्वा न करितां धन्याच्या केसालाही धक्का न लागूं देण्याचा प्रयत्न करतो तोच खरा सेवक. धन्यापासून बक्षीस मिळेल अशी आशा न धरितां जो सेवा करतो तोच खराखुरा सेवक. ह्याचंच बाळकडू मला पाजलं असल्यामुळं मी या बक्षिसाची मुळीच आशा करीत नाहीं. माझं कर्तव्य मी बजावलं. यांत अधिक ते कांहींच नाहीं. नगरांतील स्थिति जर पाहिली तर ती फारच भयंकर झाली आहे. ज्याप्रमाणे एखाद्या अरण्याला वणवा लागतो त्याप्रमाणे या खलराय्याच्या कामाशामय वणव्यानं सर्व नगराला वेढा दिला आहे. नगरांत कोणत्या मनुष्यावर केव्हां क-सला प्रसंग गुदरेल याचा नियम नाहीं. राजाचे वेळचे हुशार व विश्वासु सरदार बंदिखान्यांत शृंखलांचे

ओझें सहन करून दिवस कंठीत बसले आहेत. नगरांत चोहोकडे गुप्त हेरांची गर्दी उडाली आहे. मी वीरबाहूच्या हाताखालील सरदार असल्यामुळें मला आतां या ठिकाणीं जास्त वेळ राहाणं धोक्याचं आहे. मी जातों आतां. वरचेवर येवून सर्व हकीकत कळवीत जाईन. ( हंसराज जातो. )

मंजु०–आहाहा! सखे किती हा आनंदाचा दिवस!! आतां किनई इथं राहणं अगदीं उपयोगी नाहीं मी ह्मणते—

पद ( निज अर्भकासी )

नृप शोधनासी जावूं सखये बंधनीं ह्मणीं । मम कांतासी भेटण्यासी राजगडिं ह्मणीं ॥ ध्रु० ॥ स्वंती होतिल स्मरण होवुनी हतभागीचें या । बसले असतिल उपाय नाहीं वंदीं ह्मणुनीया । सुजनास त्रावा साच आतां नाहिं जगिं कुणी ॥ १ ॥

पुष्पा०—माझ्याही मनांत तेंच आहे. वेषांतर करून कुठंतरी जायाचं मग राजगडावरच जावूं ह्मणने झालं पण—

मंजु०—

पद ( सफलेच्छा ती करिन )

उदंड पुंडा देइन दंडा । मस्त अरीच्या मोडिन

थंडा । हारिन पतिच्या जाचुनि गंडा । निश्चय मन्म-नसीं । झाला । नृप-छळ-सूडा घेइन मोडा घाली नच यासी ॥

तूं हा गोसाव्याचा वेष घे मी पुरुष वेष धारण करते.

पुष्पा०—जा, त्या पलीकडच्या दालनांत पुरुष वेष आ-हेत त्यापैकीं एक घे.

( गोसाव्याचीं वस्त्रें धारण करते )

पद ( या विपिनींची क्रिति )

यतिसम केशि कफणि शोभा ही । देई नवाई मलाही गमे । कुंडल भगवीं वसनें हीं हीं । कम-निय रमणिय तनुला हीं । हो यतिसम यति बनलें मीं । पादनमीं । व्यसनतमीं । श्री देवी तूं ने किंक-रिसि सुखीं त्या ठायीं ॥ १ ॥

( मंजुभाषिणी पुरुष वेषानें प्रवेश करते )

पुष्पा०—व मंजु०—

पद ( वंदे नैसुर वृंदाचैत )

अंबे नामि पद अबला तव परि-पूर्ण करी । आशय कामित ॥ ध्रु० ॥ जगदंबे जय अष्टभुजे । स्मरणा करि तव करुणा-पट धरि व्यसना करि हत ॥ १ ॥ नई सुरक्षित राजगडीं । संकट हारिणि । पथ तो जननी । नाहीं परिचित ॥ २ ॥

( पडदा पडतो )

## प्रवेश पांचवा.

### स्थळ—( राजगड किल्ला )

( वीरबाहू तुरुंगांत बसला आहे असा पडदा उघडतो )

**वीरबाहू**—( स्वतःशीं ) काय ही माझी शोचनीय स्थिति ! राजाचा मी असा कोणता भयंकर गुन्हा केला आहे कीं त्या साठीं मला हें शासन झालें आहे. वीरसेनाचा पराभव करून त्याला आपला मांडलिक केलें हा तर अपराध नसेल ना ! पण यांत राजाचं कोणतं नुकसान झालं आहे ! याबद्दल जर कोणाला वाइट वाटलं तर तें माझ्या बरोबरीच्या सरदारानांच [ थांबून ] हें कारण मात्र संभवनीय दिसतं. पण या न्यायी राज्यांत इतका अंधःकार ! महाराजाची आजपर्यंत एकनिष्ठपणानं चाकरी बजावली त्याबद्दलच तर हें प्रायश्चित्त नसेल ना ! तर मग एकनिष्ठतेला उत्तेजन देण्याची ही नवीनच पद्धत समजली पाहिजे एकनिष्ठतेनें वागणाऱ्यास अशा तऱ्हेचीं बक्षिसें मिळूं लागल्यास एकनिष्ठा, राजनिष्ठा हे शब्द कधीं ऐकावयास देखील सांपडावयाचे नाहींत. व असं झालं म्हणजे स्वदेशाभिमानी, शूर व राजनिष्ठ अशा लोकांना हें जग सोडून दुसऱ्या एखाद्या नवीन जगांत राहण्यास जावं लागेल. या

सर्व गोष्टी कालगतीच्या वक्र दृष्टीमुळं होत असतात यावद्दल वाईट वाटून काय उपयोग. कालगते, पुरे हा बंदिवास—

पद ( स्मित वदनिहि )

मजवरि, करि तव चरणा। काला, नमना। न कुटिल छळण हें होइं सहन ॥ ध्रृ० ॥ वक्रदृष्टि कां केली यावरि। कंठियलें दिन कारागारीं। दासा वरिच्या कोपा आंवरि। केलि दशा मम अशि, करि करुणा ॥ १ ॥

( पुष्पावती गोसाव्याच्या वेषानें प्रवेश करते )

पुष्पा०—(स्वतःशीं) येथपर्यंत तर मजल मारली आतां या वेषाप्रमाणंच भाषणाचा रोंख ठेवला पाहिजे (उघड.)

पद ( आधीं मन मुंडा मन मुंडा )

शंकर शिव बोला शिव भोळा। नेइं लया दुरिताला ॥ ध्रृ० ॥ वामदेव हर सांब सदाशिव पिनाकि नामें असती। दर्विकरातें धारण करि शंकर शशिधर त्या ह्मणती ॥ १ ॥ वसुधा कल्याणास्तव शर्वें मस्तकिं धरिली गंगा। घेइं गरा त्या नित्य स्मरा जय त्रिविध-ताप-भयभंगा ॥ २ ॥

शंकर! शंकर !! शंकर !!! ( जवळ जावून ) अरे वीरबाहू वर पहा. असा उदास कां ?

वीरबाहू-स्वामीमहाराज—

पद ( आजवरी जनक )

दास नमी चरण तुम्ही वंद्य जगाला। चरण भेट येउनिया दिधलि कां मला ॥ धृ० ॥ हतभागी नाम तुझा विदित हें कसें ?। आला कां काय कार्य ? पापि मी असे। सर्व कथा शीण तुम्हां व्यर्थ जाहला ॥ १ ॥

या चांडाळासाठीं श्रम घेतलेत याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे. आपलं येणं कोठून झालं ?

पुष्पा०-मी आजच जयपूर नगराहून आलों. तुझ्या सारखा शूरसरदार निष्कारण बंदींत पडला आहे हें कळल्यावरून इकडे आलों.

वीरबाहू-जयपुराकडील सर्व ठीक आहेना ?

पुष्पा०-

पद ( तकदीर हमारि )

मगध प्रांत पुंड दुष्ट गांजिती अती। निंद्य कर्म आचरताति वर्णुं मी किती ॥ धृ० ॥ नृशंस मनुज राज्यकारभार पाहती। योषितांचि दैन्य दशा होतसे अती। अबल षंढ मनुज तुल्य जाहली स्थिती॥ १॥

वीरबाहू-(दुःखानें) हायरे मगध प्रांता! राजाच जर असं अनीतीनं वागूं लागला तर मग काय करायचं?

पुष्पा०—या सर्व दैन्यावस्थेला राजा कारण आहे अशी जर तुझी समजूत असेल तर ती चुकीची आहे. महाराजावर केवढा प्रसंग ओढवला होता याची तुला कल्पनाही करतां यावयाची नाहीं. महाराज शिकारीला गेले असतां पाठीमागून मारेकऱ्यास पाठवून त्यांना ठार मारण्याचा बेत केला होता परंतु हंसराज नामक सरदारास हा गुप्त बेत कळल्यामुळें त्यानें त्याचक्षणीं मारेकऱ्याचा पाठलाग करून महाराजास सोडविलें. राजेसाहेब शिकारीला गेले ते चुकले अशी वार्ता सर्व नगरांत पसरवून दिली आहे. तुला इकडे लढाईच्या मिषानें पाठवून कैद करून ठेवलें आहे. महाराज हल्लीं वेषांतर करून फिरत आहेत खलरायानें नगरांत धुमाकूळ मांडला आहे. नगरांतील सर्व लोक अगदीं त्रासून गेले आहेत. बिचाऱ्या पुष्पावतीवरही असाच एक भयंकर प्रसंग गुदरला होता. नगरांतील तरुण व सुंदर मुलींच्या आईबापांना व कित्येक सुंदर स्त्रियांच्या नवऱ्यांना दिवसाढवळ्या भीति वाटत आहे.

पद ( रविकुलीं हरिश्चंद्र )

असुनी शूर वीर वीरा। षंढ नरासम बनुनी शूरा भोगीसि कां कारा ॥ मगधा तुजविण नच थारा। राजी-कुमरा कां तूं येरा होसी हाणियारा ॥ उतरी

**वसुंधरा भारा । पराधीनता लहरी माजी बुडलासी चतुरा ॥ शूरा राजनीति-चतुरा । दूर कराया धरा-असौख्या घे करिं हतियेरा ॥ १ ॥**

अरे, या खलारायाची या प्रांतावर चाललेली गांजणूक पाहून कोणाच्या हृदयाला चरका बसणार नाहीं? या दुष्ट सरदारांनीं तुह्मावर पाहिजे तसा जुलूम करावा, तुमच्या बायकांच्या मंदिरांत शिरून वाटेल तसे बहकावें तुमच्या राजाच्या राणीवर हात टाकण्यस तयार व्हावं, आणि या सर्व गोष्टी तुह्मी निमुटपणें सहन कराव्यात अं. अरे ज्यांच्या बाहुपराक्रमाचं क्षात्र-तेज या प्रांतावर आजपर्यंत चमकलं ते तुमचे प्रतापी पूर्वज तुमच्या स्मरणांतून पार गेले? तुह्मी त्यांचे वंशज ही तरी गोष्ट खरी कां? रणवीर रावासारखे शूर नरवीर आपल कर्तव्य पूर्णपणें बजावून स्वर्गी आनं-दानं वास करीत आहेत आणि तुह्मी मात्र षंढाप्रमाणं तुरुंगांत आश्रु ढाळीत बसला आहांत. धिःकार! धिःकार असो तुमच्या सारख्या शूर सरदाराला! जयदेवीसारख्या शूर राण्या जिवंत असत्या तर तुह्मो त्यांचं दास्यत्व तरी पतकरिलं असतं पण तशा शूर स्त्रियाही जिवंत नाहींत वीरश्री, देशाभिमान व राजनिष्ठा यांनीं नगरांतून पळ काढला आहे. नीती-ची व सुविचाराची न्यूनता पडल्यामुळं दुर्विचार व

अनीती यांनीं तंगड्या झाडून धिंगाणा घालण्यास प्रारंभ केला व त्यांना कामवासनेनं व्यापलेलं मन रुप रान मनमुराद धिंगाणा घालण्यास सांपडल्यावर त्या धांगडधिंग्यांत पुष्पावती वगैरे स्त्रियांच्या पातिव्रत्यावर घाला आल्याशिवाय कसा राहील ?

वीरबाहू-अरेरे हें वृत्त ऐकल्यापेक्षां मी मेलों असतों तर काय वाईट झालं असतं ( आवेशानें )

पद ( असा कोणरे मदन )

नृपति छळ-सूड घेईन यतिराज। छळिन त्यासीं जयें छळिलीं नृपभाज ॥ धृ० ॥ करिन मी त्रस्त अरि असति ते प्रबल जरि। राखुनी कांहिं निज-देश-जन लाज ॥ शस्त्र घेवून करिं सर्व रिपु-गर्व हरि। करिन रण उतरण्या सकल रिपु-माज ॥ १ ॥

मात्र माझी या ठिकाणाहून मुक्तता झाली पाहिजे.

पुष्पा०-आतां जयपुरास जावून तीच व्यवस्था करतो. कांहीं काळजी करूं नकोस.

वीरबाहू-महाराज आपण जयपुरास जात आहां ह्मणून माझी विनंती आहे.

पुष्पा०-काय बरं-

वीरबाहू—

पद ( मित्रा मम जन्मकथा )

साधो मम वृत्त कथा जावुनी पुरीं । कांतेसी सांग धीर धरुनि अंतरीं ॥ धृ० ॥ राहि सुखें शोक कधीं करि न मानिनी । कपट करुनि नीचांनीं मनासि बंधनीं । ठेवियलें स्थाना या कैदियापरी ॥ १ ॥ ईशावर भार ठेवि रुदन नच करी । मत्शोधा येवुं नको त्यजुनिया पुरी । स्वांतरिं धरि धैर्य सुदति प्राणसुंदरी ॥ २ ॥

पुष्पा०–तुझ्या स्त्रीला हें वर्तमान कळलं असून ती नगरांत नाहीं असं मला समजलं आहे. मी जातों आतां.

( ' शंकर शिव बोला ' हें पद म्हणत पुष्पावती जाते )

वीरबाहू—हे यती म्हटले म्हणजे मनुष्य स्थानापासून दूर असणारे असं असून याला नगरांतील सर्व गुप्त बातम्या आहेत हें आश्चर्य आहे.

पद ( पुनरपि नयना )

निरखुनि स्थळिं या यति-मूर्तीला । कौतुक गमत मला वंदितुनी सोडवील मजला ? ॥ धृ०॥ पाठविलें कोणीं हतभाग्या । निर्वाणीं या धृति देण्या या । हो इच चकित मला ॥ १ ॥

हे परमेश्वरा केवढा हा गहजब ! ज्या राजानं खलरायाला इतक्या योग्यतेला चढविलं त्याचा खून कर-

वण्याची कल्पना त्या चांडाळाच्या मनांत आली तरी कशी ! कैद, खून, बलात्कार अरेरे ! परमेश्वरा.

पद ( विधात्या तुझी चित्र )

असे सिद्धता ही हराया अकें । तुझी वर्णिताती कवी ते मुखें ॥ धृ० ॥ महीला खळ अरी दीधती ताप भारी । तुला कां दया ये न आतां हरी ॥ १ ॥ त्रासली नयानें अश्रुधारा अती । पदाब्जास विनवी. मही या अकें ॥ २ ॥

असे दिवस यावेत अं ! ज्यांचा यशोदुंदुभि कर्णरंध्रांतून पार जावून शत्रूंच्या छातींत लाथ बसल्याप्रमाणें होवून त्यांची कंबर खचून जावून त्यांच्या काळजानें ठाव सोडावा तेच आमच्या पूर्वजांचे वंशज आह्मी या परसांतील मुठभर शत्रूंना हार जावून त्यांच्या तुरुंगांत ढाजाळू सारखें बसावें ! धिःकार धिःकार असो आह्माला--जे आह्मी सौख्यामृताच्या अफाट समुद्रांत डुंबत होतों तें अमृत गोड न वाटून दुःखाच्या अफाट डोहांत पडलों आहोंत. हे परमेश्वरा जयपुरांतील युवति जनांचा आलाप अद्याप तुला ऐकूं येत नाहीं काय ! राजाचा घात–कायदेशीर लुटारूपणाचें हें धडधडित प्रत्यंतरच–ऐतिहासिक काळावरून पाहातां ज्या ज्या राजाचे खून झाले किंवा ज्यांचे ज्यांचे खून करण्याचे प्रयत्न के-

ले ते राजे जुलमी दुष्ट असे होते पण जो सर्व प्रजेला मुलाप्रमाणें वागवी, न्याय सर्वांना सारखा देई त्या राजाचा खून करण्याचे विचार प्रत्यक्ष त्याच्या प्रधानाच्या मनांत यावेत ही आश्चर्याची गोष्ट आहे. नगरांत तर सर्व लोकांच्या तोंडून सूड व अन्याय याशिवाय दुसरे शब्दच निघत नाहींत. आम्हा पुरुषांच्या हातून तर आतां कांहीं होण्याचें चिन्ह दिसत नाहीं; या दुष्टांच्या कपट कृत्याचा अभंग सेतू भंग करण्याचें ज्यांना स्वतःचें पातिव्रत्य कसें राहील अशी भीती वाटत आहे अशा दुबला अबलांच्या मनांत येवून त्या सबला होवून प्रबल वीराप्रमाणें अतुल लीला करून ही सकल अचला दुमदुमून टाकतील यांत मुळींच शंका नाहीं.

पद ( आंवरि आंवरि )

धांवुनि धांवुनि या समयीं या । भक्तांता कां बघतां सदया ॥ धृ० ॥ हरण शांतता पुरीं झालि या । प्रस्थापित ती करण्यास या ॥ १ ॥ करुनी शासन दुष्टातें या । परबंधानल हा शमवाया ॥ २ ॥

या पेक्षां मरण आलेलें काय वाईट ( थांबून ) पण मरण कां—( आवेशानें)

अपूर्ण साकी

त्या नीचाचा घेइन सूडचि शांत मनस तैं हो कीं ।
तोंवरि अंतरिं सूड सूड ही जोड सदा राहिल कीं ।

येथून मुक्तता झाल्याबरोबर अगोदर सूडाचा बेत;
हे परमेश्वरा :—

पद

चरणा नमना करुणानिधे करी पुरवि तूं मम कामना
धृ० ॥ सद्धेतू मन्मानिं असति सकल ते पूर्णत्वा नेईं
वचना । सकल व्यसन हरि करी सदया प्रभु
पालना ॥ १ ॥

( डोळे मिटून ईशस्तवन करीत बसतो )

प्रिये तुझी काय अवस्था झाली असेल

पद ( मजला वरिल सुभद्रा )

पुढती पाहिन कांतेला । आस न आशि मजला ॥धृ०॥
अंतरंग मम होई दंग । चिंतनीं यत्कीर्तीचा भंग ।
होई, पराधीनता संग । ओढी सकल वीराला ॥ १ ॥
राणिवसा माझारी ललना करिब असेल दिन रजनीं
रुदना । सखिवृत्त मुळीं मजासि कळेना । काय करुं
मी याला ॥ २ ॥

( मंजुभाषिणी पुरुष वेषानें प्रवेश करितें )

मंजु०—

पद ( मार दियेरे )

बंचि सकल शोक । सकल दुःख जाइल विलयातें हा शोक । धैर्य-राज होई धरीं अंतरीं विवेक । अ-खिल असुख शपल सोड सोडि सकल शोक ॥ १ ॥

वीरबाहू—हा अभयकारक शब्द कोणाचा बरं असावा?

पद ( लंबोदर गिरिजा )

तव अभय वचन हें ऐकुनी । धृति येई अति या मन्मनीं ॥ धृ० ॥ विनति तव पदीं करि हा किंकर । वंश कवण तव कुठील नृपवर । उपकृति केली या दीनावर । वृत्त कथा मज या क्षणीं ॥ १ ॥

मंजु०—मी खलरायाकडून आलों आहे माझं नांव पौर्वसेन खलरायमहाराजानीं कांहीं निरोप पाठविला आहे.

वीर०—कोणतां बरं निरोप—

मंजु०—

पद ( श्रवणांत पेरणी )

जरि येशि शरण तूं मजला । बंधना-पासुनी तुज-ला । जाण मी ॥ करि, भोगि, मुक्त सौख्याला । करिन सेनानि दळिं तुजला । जाण मी ॥ चाल । नच येसि । शरण तूं मशीं । तरी या वासि भोगि अ-सुखाला । आजन्म छळिन रे तुजला । जाण मी॥

वीरबाहू—रत्नाकर आपली मर्यादा सोडील. पूर्वेकडील सूर्य अन्य दिशेस उगवेल, कोल्हा वनराजाचा पराभव करील पण हे मस्तक त्या पायावर कधींही लोळण घेणार नाहीं.

पद ( वायुनंदन रदन करकर )

मृत्यु बरवा परि न होई मी कदापी शत्रु चरणीं। लीन, मजसी तैल भाजानें कढति मानिन तोष स्वमनीं। आस नच कटकाग्रणी पदिं, बंदिवासीं फार, द्रविणीं। सौख्य मजसी गमत दुःखद लीन नच हो शत्रु चरणीं ॥ १ ॥

मृत्युलोकच्या या सजीव यमपुरींत माझे वाटेल तितके हाल करोत परंतु दीन अबलांना हाय हाय करावयास लावणाऱ्या त्या नराधमाला शरण जाणें कधींही घडणार नाहीं. महाराज, झालं आपलं काम. आतां आपण क्षणभर येथें उभे राहूनका उगीच या अंतःकरणाला मर्मभेदक भाषणं बोलून कां टोचतां ? कर्मानुसार या गोष्टी व्हावयाच्या असतात.

( मंजुभाषिणी पुरुष वेश टाकावयास जाऊन स्त्री वेष धारण करून येते. )

मंजु०—

पद ( सुरांगना-भिलाष हा )

चरणारविंदि लीन दासि मंजुभाषिणी ॥

वीरबाहू–( दचकून ) अरे मी स्वप्नांत तर नाहींना !

मंजुभाषिणी–

स्वप्न नसे होय खरी मंजुभाषिणी ॥ धृ० ॥ बंदि-वास, धैर्य धरा, दूर जाहला ॥ चंड समर करुनि दंड देवुनी खला ॥ मगध-भूमि-त्रास सर्व हारि जावुनी ॥ १ ॥

( पायांतील शृंखळा काढते )

पद ( कोइ सुनो मेरि फरियाद )

मृदु देहातें दिधलें ॥ धृ० ॥ श्रम, विव्हळ केलें बळ तनुतें नुरलें । दुःख, फसला बंदि जणु कां पंचानन, नुरलें । हाय ! हाय ! हायहाय ॥ १ ॥ जळ लोट नयनिचे निशिदिनिं नच खळलें । बंदिवासीं सौख्य तनुला कांहीं नच मिळलें ॥ २ ॥

[ पाय चेपते ]

वीरबाहू–बंदिवासांत सुख कां मिळत असतं ?

पद ( धरि आंवरुनि )

त्याजि सुदती आतां शोक हा ॥ प्राणवल्लभे दिन यत्वें तव प्राप्त मशीं सखि हो हा ॥ धृ० ॥ दुर्दैवी गे कारण झाला तव दुःखातें या हा ॥ १ ॥ कष्टवि-लेंसी माझ्यासाठीं सखये या मृदु देहा ॥ २ ॥

मंजु०—आपला देह आन माझा देह दोन कां आहेत? बरं आपणाला गोसाव्यानं सांगितल्याप्रमाणं आपली मुक्तता तर झाली आतां पुढच्या कार्याला लागायचं

वीर०—त्या यतीचा आणि तुझा परिचय आहे वाटतं.

मंजु०—आह्मीं जयपुराहून बरोबरच आलों त्याच्या मुळेंच मला इथं येण्यास सांपडलं.

वीरबाहू—त्याचं नांव तुला माहित आहे का?

मंजु०—

पद ( दिलचमनमेंबीच )

बंधनीं तुह्मातें बोध जयानें केला। तो यती नसोनी होति भूपति-महिला ॥ धृ० ॥ चाल ॥ खलराय येई पुष्पावति-मंदिरीं। दुष्ट तो जवळिं जाई त्या अवसरी। पति—शस्त्र काढिलें तीनें सत्वरी। पाहोनि शस्त्र तें मंत्रि पळुनिया गेला। छळितसे येवुनी मैंद मंदिरीं तिजला ॥ १ ॥

आणूं का त्यांना बोलावून? त्या बाहेर उभ्या आहेत.

वीर०-हें काय विचारतेस? जा, जा, अगोदर घेवून ये.

[ मंजुभाषिणी जाते व पुष्पावतीस स्त्री वेषानें घेवून येते ]

बाई साहेब, सेवकांनीं धन्याची सेवा करावयाची तें राहून धन्यालाच सेवकासाठीं त्रास भोगण्याचे प्रसंग आले या पेक्षां हा निगरगट देह येथें कुजत पडला असतां तर काय वाईट झालं असतं.

पुष्पावती—

पद

धरोनि व्हा तयार । मनाधाजी धृति । दावोनीया कृति । करोनि घळावहार ॥ नका करूं अतां विचार । संभार करोनि । असिवार घेवोनि । अरि-वृंदासि ध्यायासि मार ॥ १ ॥

या किल्ल्यावरून खालीं जाण्यासाठीं एक गुप्त वाट पाहोरकऱ्यानें मला दाखविली आहे त्या वाटेनें आपण तिंच बाहेर पडूं चला लौकर.

वीरबाहू—

पद ( यारे दावड दादा )

देवुं विजय शंकर मला । कंदनीं ईश आजि या खळ पाशा, म्हणुनी सटलों या रणिं मजला ॥ ध्रु० ॥ जरि न मिळे यश तरि या नगरीं दावी नच हें मुख काळपुरीं । पाठवीन तनुला ॥ १ ॥

( पडदा पडतो )

अंक २ रा समाप्त.

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

स्थळ—( जयपूर नगर मर्यादे पलीकडील अरण्य )

( मंजुभाषिणी पुरुष वेशानें प्रवेश करते )

मंजु०—राजगडाहून पुष्पावती व मी दोघीजणी निघालों वाटेंत पुष्पावतीची आणि माझी चुकामुक कां पडावी ? प्राणनाथ सुटले असून लढाई देणार हें कळल्याबरोबर त्यानं सैन्यांत फितुरी चालविली आहे असं माझ्या कांनीं आलं आहे.

पद ( तुजे मेरी कसम )

मन कसें दचकुनी जाइ ऐकुनी कटा। कशि लाज
नसे या दुष्टा, या मिषें पाबि-दिठा। जातें स्मरारी
निवारी संकटा॥ १॥

अरे चांडाळा असा कपटानं कां वागतोस? आतां ही बातमी त्यांना कळावी कशी ? बोलून चालून मी बायको माणूस मला कोणी ओळखलं तर कसं होईल.

पद (स्थिर मन न राहि)

**नाहीं कांहींच सुतरि व्यसन-जलधि मधुन दिसत तारण्या मला ॥ धृ ॥ कोणि तरी मानिल कां समर-स्थळीं मजला। बहु सेनानी शूर असति कटाकें लढायाला। या वेषानें जाइल कां काज शेवटाला। याहीं मुळिंच कांहिं सौख्य नाहिं। दुःखितशा तनुला ॥१॥**

ही बातमी प्राणनाथाला कशी तरी कळविली पाहिजे. ( चालूं लागते इतक्यांत समोरुन खलराय येतो त्यास पाहून दचकते ).

**मंजु०**–( स्वगत ) हा तर चांडाळ, मेला इकडे कोणीकडे आला ? मेल्यानं मला पाहिलं आहे तेव्हां पळून जाण्याची तर सोय नाहीं. हा पहा अगदीं जवळ येत चालला. ( खलराय प्रवेश करतो )

**खलराय**–( पाहून ) यंव हीच आमची शिकार,

**मंजु०**–महाराज रत्नपूरचा रस्ता हाच ना ?

**खल०**–हो हाच; पण कायहो तुमच्या या मुद्रेवरून तुह्मी कृत्रिम पुरुष असावे असें वाटते.

**मंजु०**--मग तर तुह्मी पूर्णपणें फसलात.

**खल०**–फसेन कसा ? प्रिय वस्तुला कोण विसरून जाईल ?

**मंजु०**–( स्वगत ) या मेल्यानं मला ओळखलं खास. आई अंबाबाई आतां माझी पाठीराखी तूंच आहेस

खल०—

पद ( हा पुरुष भाग्यवान )

**स्वांत-मोहिनी । चकोर- लोचनी । अंतरंग मुदित करी चंद्रआननी ॥ सुख-विलासिनी । चित्त हारिणी सुचे न कांहिं सौख्य नाहिं मजसि मोहिनी ॥ १ ॥**

( पुष्कर प्रवेश करितो. )

पुष्कर–हीं सर्व लबाड पोरें मला चुकवून कोणीकडे गेली हें कळत नाहीं. दमघरा गुलामानों मला फसवतां काय ? ( समोर पाहून ) पण हे दोघे येथें कोण उभे आहेत.

मंजु०–तुमच्यासारख्या थोरांना हें चांगलें नाहीं.

खल०–तुझ्यासारख्या शहाण्या स्त्रीलाही पण हें चांगलं नाहीं.

पुष्कर–( स्वतःशीं ) काय बेटा मूर्ख आहे ? पुरुषाला स्त्री म्हणत आहे.

मंजु०–या दीन अबलेला कां उगाच छळतां ?

पुष्कर–( स्वतःशीं ) हा पुरुषही स्वतःला स्त्री म्हणवून घेत आहे. चमत्कार आहे हा.

मंजु०–कां उगाच उभे, चालते व्हाना को ! नीट विचार करा.

खल०—माझ्यासारखा मनुष्य तुझा दासानुदास होण्यास तयार असतां त्याला तूं झिडकारतेस याचाहि पण विचार कर.

पुष्कर-(स्वतःशीं) असें; हा निर्दय मनुष्य या स्त्रीच्या नादीं लागलेला असावा व त्याच्या जाचांतून सुटण्यासाठीं हा वेष इनें घेतला असावा.

पद ( फरमाओ )

खल०—

मधु भाषणानें सुंदरि फसलों मी तव नादानें।

मंजु०—

चांडाळा कुटिला करीसी कां अशा पापा॥

खल०—

रुपखने । ही सुमनें । वश रमणे । या सुंदरा दे प्रेमालिंगन आणि संतोषानें।

मंजु०—

सोडीसी कां नाद न रौरविं कुला पाठवीसी। मम वाणी । परिसोनी । सोडोनी । नादास या।

खल०—

वश होई सुंदरि यातें तूं सुमनें ॥ १ ॥

( जवळ जावून स्पर्श करण्यास सिद्ध होतो इतक्यांत पुष्कर तरवार उपसून प्रवेश करतो )

पुष्कर–

पद ( अशावरा तु )

गांजितोसि या नरा । व्यर्थ कां खळा खरा ।
भीति कशि नसे जरा । कुटिल तदिय अंतरा ।
सोडिसी न या नरा । अंतराळिं गरगरा ।
फिरावयास तव शिरा । पाठवीन रे खरा ॥

खल०–ए पोरा फारशी बडबड चालविली आहेस. मुकाट्यानें बसतोस कां–( तरवार उगारतो )

पुष्कर–( तरवार उगारून )

पद ( करी झडकरी )

संगरा-साठिं मी ठाकुनी या क्षणीं । परिभवीन दावुनी बाल-करणी ॥ ध्रु० ॥ सदनिं मनिं भोजनीं शयनिं यानीं वनीं । रंजनीं वाचनीं युद्ध शूरा ॥ तरुण वा जरठ नर कोणिही तो असो । कंठ त्याचा शरें छेदुनीया ॥ पाठविन त्या प्रती । मृत्यु सदनाप्रती । दावि नच भीति मज बाल ह्मणुनी ॥१॥

खल०–अरे जा उगीच बडबडतोस कां ?

( पुष्कर ' गांजितोसि या नरा ' हें पूर्वोक्त पद ह्मणतो व तरवार उपसून खलारायाच्या आंगावर जातो इतक्यांत खलराय घाबरून पळून जातो ).

मंजु०—( त्याला जवळ घेऊन )

पद ( सुंदर रमणीचा )

नामा तव बाला । कथी रे वसती स्थानाला ॥
पुत्र कुणाचा देश कवण तव विजनिं कसा येशी ।
थार कुणाचा एकलाच या रानिं कसा फिरशी ॥ १

पुष्कर—

पद

नच जनिता जननि मजशीं ॥ धृ० ॥ पालन करि मम प्रेम करांनीं । अंबर भगवें ज्याचें तो मुनि ॥ १ ॥ करुनि तपा तो विपिनीं राही । युद्ध कला शिकवीली मज ही । त्याविण कोणी नच मशीं ॥ १ ॥

माझी हकीकत विचारून घेतली आतां तुझी सांग ना ताई. मी तुला ताईच म्हणेन अं: चालेलना. मी ऐकलं तें सर्व बोलणं.

मंजु०—हो चालेल बरं मी तुला काय म्हणूं तुझं नांवेर काय?

पुष्कर—ती एक मोठी गमतच आहे. आमचे गुरुजी एकदां स्नानाला गेले होते परत येत असतां. एक वाघ मला तोंडांत धरून पळत चालला होता. त्या वेळीं गुरुजींनीं मोठा गलबला करून त्या वाघास भेदरविलें आणि तो वाघ मला तेथें ठेवून सूं पळत सुटला मी त्या पुष्कर तीर्थानवळ सांपडलों म्हणून त्यांनीं माझं नांव पुष्कर असें ठेविलें आहे.

मंजु०-( स्वतःशी ) या याच्या जन्मवृत्तावरून हा माझ्या पुष्पावतीचा बाळ असावा असं वाटतं.

पुष्कर-ताई तुझं नांव काय ?

मंजु०-माझं नांव मंजुभाषिणी.

पुष्कर-ताई या प्रांताचा राजा कोण, तूं अशा वेशानें कां हें मला सांग ना.

मंजु०-बाळा चल आतां आपण त्या झाडाखालीं विश्रांति घेवूं ; तेथें तुला सर्व सांगतें.

पुष्कर-हं चल.

मंजु०-अरे पण तुझे गुरुजी तुझी वाट पहातील ना.

पुष्कर-पाहूं देत मी येतों तुझ्याबरोबर.

( जातात. )

---

प्रवेश दुसरा.

स्थळ—( रणभूमी जवळील मैदान )

( वीरबाहू खिन्न मुद्रेनें प्रवेश करितो. )

पद ( गत वैभव झालों )

**मज नाहिं जयाशा समरीं या ॥ धृ० ॥ रणचत्वरिं नच बळ-हानी तें । गाणि, विनतासुत जेंविं फणीतें । भासे रिपु-दळ तैसें मातें । फूट कटक-नाशा करी या**

काय या नशीबाचे विचित्र चाळे ! बंदींतून सुटून लढाईच्या यत्नास लागलों तों इकडे कपट मंत्राचा प्रभाव ! ज्या सरदारांनीं मला मदत करण्याचं कबूल केलं ते आयते वेळीं कसूर करतात ह्याला काय ह्मणावं ? हें सरदारांच्या तीव्र शस्त्रांनीं समरांगणांत चमकावयाचं टाकून व्यर्थ कां गंजतां ? अरेरे ! ! या शस्त्रांनां देखील कपट मंत्रानं भारून टाकलं आहे क्षात्रवंशांत जन्मास येवून केवढा कलंक ! या पेक्षां बैल झालों असतो तर बरं झालं असतं. आतां हे काळं मुख कोणाला दाखवूं ? महाराणी काय ह्मणतील; त्यांच्या समक्ष या मुखानं केलेली प्रतिज्ञा खोटी ठरूं पहात आहे. हे वीरबाहूच्या देहा कां [illegible] तळमळ करतोस ? युद्धांत जय मिळत नाहीं तर निर्भत्सना सहन कर अथवा भयंकर लढाई करून जा स्वर्गसुख भोगण्यास. ( थांबून ) हे मस्तका उगाच कां भणभणतोस. पण मी एकटा काय करूं परमेश्वरा !

पद ( झंपा )

वृथा क्षात्रवंशीं मला निर्मिलेंसी । वदन आतां कसें दावुं देशीं ॥ धृ ॥ मुक्तता बंदितुनि केली भूपांगनें । कां धरे उदरिं तूं या न घेशी ? ॥ १ ॥ विद्युते धाम तव लोपलें ? कडकडुनि । पातक्या पृथ्वितळिं कां न नेशी ? ॥ २ ॥

हे वसुंधरे, तुला त्रास होत असतां माझ्यासारखा वीर अथवा षंढ नुसते डोळ्यांत अश्रू आणून रड-त बसला आहे अशा महा पातकी नीचाला तूं आपल्या उदरांत कसा घेशील ?

( मंजुभाषिणी व पुष्कर प्रवेश करतात )

मंजु०—ज्यांच्याकडे आपणाला जायाचें ते हेच बरं.

पुष्कर–अहो सरदार अहो वीर—

पद ( झंपा )

क्षात्रसुत असुनिया कां भितां कंदना । खड्ग घ्या करुनि ईशासि नमना ॥ धृ ॥ देश कार्यासि हा देह या रणिं पडो । क्षात्र-भट भीतिं नच समरिं-मरणा ॥ १ ॥ फसवुनी मंत्रि सरदार जे नेइं ते । आणितों बोध मी करुनि त्यांनां ॥ २ ॥

वीर०—( वर पाहून )

पद

शिशु-शर-वाणि ऐकुनी मदीय नेत्रिं या । प्रेमांबु येति विपिनिं बाल येइ कासया ॥ हा क्षात्र शूर बालवीर देइं धात मला । बोध करित वय लहान धैर्य फार या ॥

( मजुभाषिणीला पाहतांच दोघे कडकडून भेटतात ).

मंजु०—आतां ही बोलण्याची वेळ नाहीं. अगोदर इष्ट कार्यास सुरुवात करून नंतर मग दुसरा विचार.

पुष्कर—वीरवहो तुम्ही या बाजूला जा. मी या बाजूला जातो आणि ताई तूं त्या बाजूला जा. हे सूर्यनारायणा

पद ( झंपा )

नमन हे करितसे चरणिं तव दिनकरा। देइं बळ बालका आजि समरा ॥ धृ ॥ जनानें मत्तात झणिं भेदुं या बालका। विजयि करि कंदनीं आज मिहिरा ॥१॥

( पुष्कर जातो )

( मंजुभाषिणी व वीरबाहू एकमेकाकडे पाहत निघून जातात )

( पडदा पडतो. )

( पडद्याच्या बाहेर )

( वीरबाहू एकटा प्रवेश करतो )

वीरबाहू—हे मस्तका तुझ्यांत या अपेशाच्या विचारांनीं जो धुमाकूळ माजवला होता त्या विचारांना पार हुसकून लावून हो शांत! निराशेनं स्वस्थ बसलास त्या तुला येवुं दे तरतरी! नेत्रांनों जें जें तुह्मांला अशक्य दिसत होतं तें तें शक्य आहे असं पहा आणि त्या पुष्कराच्या वीरश्रीकडे सारखी नजर फेंकून रणांत रक्तपात पाहून व्हा शांत. हे भडकणाऱ्या मना लगाम आंवळून जसा अश्वाला धरतात त्या प्रमाणं तुझ्यांत येणाऱ्या विचारांना धर आणि त्या बाळाच्या उपदेशाचं स्मरण कर हस्तांनों तरवारीच्या मुठी अगदीं घट्ट धरा आणि बिलकूल कसूर करूं नका

हे अरण्यांतील वन-देवतांनो या अरण्यांत तुह्मांस मी विजयी होवून यावं असं वाटत असेल तर चला ता भयंकर प्रसंग पाहायला आणि चिंता याला जय! हे अरण्यांतील गगन चुंबित तरुवरांनों ज्या तुह्माखालीं मी निराश होवून बसलों होतों त्या तुह्माखालीं पुन्हां मी बसावं अशी जर तुमची इच्छा असेल तर याच्या जयाची करा चिंता नाहीं तर लागूं द्या याला रणांगणांतील शस्त्रमंचकावर अक्षय निद्रा. हे सूर्यनारायणा कर याच्या हातून ही कार्य समाप्ती.

पद ( जा कसें नगर )

भास्करा विजायि समरीं ॥ धृ ॥ करि या दासा आजी । व्यसन हरी । देईं बळ कदनीं । स्फूर्ती या मम शरिरीं ॥ १ ॥ कृपा दृष्टिनें रंगि ठेवी । पुष्कर या । नृप-बाला वरि मम स्त्रीवार दे । स्फूर्ती या मम शरिरीं ॥ २ ॥ ( वीरबाहू जातो )

---

## प्रवेश तिसरा.

स्थळ—( सदानंद स्वामीचा आश्रम )

( सदानंद स्वामी सांबाची पूजा करीत आहे असा पडदा उघडतो )

सदानंद—काय करावं या पोराला. फुलं आणण्याला गेला तो तिकडेच; आतां येतो ह्मणाला.

( पुष्पसेन व हंसराज गोसावी वेषानें प्रवेश करितात. )

**पुष्पसेन**-महाराज, आज्ञेशिवाय आपल्या मठांत आलों याची माफी असावी.

**हंसराज**-आपलं नांव ऐकण्याची या दासाची इच्छा आहे

( दोघे नमस्कार करितात )

**सदानंद**-माझं नांव सदानंद स्वामी--मी जयपूरच्या राजाचा गुरु आहे परंतु त्या राजाला मी कोठें आहे हें माहीत नसल्याकारणानें आजपर्यंत मी याच अरण्यांत राहिलों. आमचा एक धाकटा बालक तुह्मांला भेटला कां कोठें? मी एकदां स्नानाला गेलों होतों परत येत असतां एक वाघ एका मुलाला तोंडांत धरून चालला होता मी गलबला करून त्या वाघाला भिवविलें; तो वाघ त्याला तसाच तेथें टाकून गेला. त्या मुलाला घरीं आणून आज पर्यंत मी त्याचं पालन केलं. आज फुलं आणायाला ह्मणून गेला आहे तो अद्याप त्याचा पत्ता नाहीं ह्मणून मला मोठी काळजी लागली आहे.

**पुष्पसेन**-( गोसाव्याचा वेष टाकून पाय धरतो. )

अपूर्ण साकी

**अपराधी हा पुष्पसेन नृप आजवरी विस्मरलों । तापसि बनलों तुह्मासम मी नगरातें मम मुकलों ॥ १ ॥**

**सदानंद**–राजा ऊठ ऊठ; तुझं कल्याण असो. उगाच कष्टी होवुं नकोस.

**पुष्पसेन**–गुरुमहाराज तो बालक माझाच असावा कारण

**पद ( काय मला भूल )**

**गेलों भार्येसह मृगयेस काननीं । भूवरि, बोलत बसलों, बाल ठेवुनी ॥ धृ ॥ आनंदीं आह्मा नच भान राहिलें । व्याघ्रानें बालातें वदानिं घेतलें । गेला तो सेवकांनिं दुरुनि पाहिलें । घेतलेति कष्ट मादिय बाल-पालनीं ॥ १ ॥**

**सदानंद**–अरे यांत काय वाईट झालं. माझं कर्तव्यच होतं ते. शिवाय शिष्य गुरूचा नेणत संबंध होताच पण ही गोष्ट झाली कधीं ?

**पुष्पसेन**–महाराज सुमारें १० वर्षें झालीं असतील.

**सदानंद**–तुझी अशी दशा कां झाली हें मग ऐकूं अ-गोदर चल पुष्कराचा शोध करूं.

**पुष्पसेन**–त्याचं नांव पुष्कर काय ?

**सदानंद**–हो. चला तर आपण त्याच्या शोधास जावूं. विभांडका हें पूजेचं सर्व साहित्य आंवरुन ठेव आणि इतक्यांत पुष्कर जर आलाच तर त्याला कोठें बाहेर जावूं देवूं नकोस.

( पडदा पडतो )

## प्रवेश चवथा.

### स्थळ—( अरण्य. )

( म्हातारा व त्याचा मुलगा प्रवेश करितात )

म्हातारा–बाल्या पुर कर ही लाकड फोडनं. हे पगलस कां तुझं कुडतन घामानं भिजलया.

बाळ्या–बाबा ह्यो असा घाम निघतो तवा वइच पोटालामिळतं, न्हाइतर ह्येला रकटी बांधुन शांत सवस्थ बसनं व्हायाचं.

म्हातारा– ( लांब पाहून ) बाल्या ह्योर लेका कुनाचा पोर येंत आहे हकडं.

बाळ्या–बाबा ते पोर कुना तरी पैकवाल्याचं दिसतया त्येचा पोसाक लै मोलवान आन तेच्या हातामंदी पांढरी सुभर रुप्याची लांब कोयती हाय. आन गरबी हाय .

( पुष्कर प्रवेश करतो )

पुष्कर–म्हातारे बाबा हा मुलगा तुमचा कां. !

म्हातारा–व्हय व्हय.

पुष्कर–कायहो या देशाचा राजा कोण?

म्हातारा–बाबा काय करायच इचारूनशान त्येस्नी त्येच्या परधानानं मारलं ह्मन; त्याची रानीबी कुठं

पळून गेली ह्मनत्याती आमच्या वीरबाहूलाबी कैद केलं ह्मनात्यती.

पुष्कर—ह्मातारे बाबा तुमचा राजा जिवंत असला तुमचा वीरबाहू सुटला असला तर तुम्ही काय कराल?

ह्मातारा—त्या परधानजीचा सूड घेण्यापईं कायबी करूं.

पुष्कर—मग या तुमच्या गावांत लढाई करण्यासारखे कांहीं लोक आहेत कां नाहींत?

ह्मातारा—हो पुष्कळ आहेत.

पुष्कर—मग जा तर त्यांना घेवून या; वीरबाहू आज लढाईस उभा राहिला आहे त्याला मदत करायला जा.

ह्मातारा—बाल्या जार त्यां सटव्याला, दगड्याला, किरस्यानाला, त्या गेन्याला, समद्याला हकड घेऊन ये बिगी.

( बाल्या जातो. )

( इतक्यांत कांहीं शिपाई प्रवेश करितात )

पुष्कर—अरे शिपायांनों उभे रहा तुह्मी कोणाकडचे आहांत?

शिपाई—खळराय राजाकडचे.

पुष्कर—आग लाव त्या राजेपणाला; वाहवारे अभिमानी आपल्या राजाच्या विरुद्ध लढण्याला तुह्माला कांहीं शरम.

पद ( पूरव पच्छम उत्तर. )

खष्ट प्रधानें वरुनि कपटमति छळिलें मेदिनि रमणातें। भुलुनि तयाच्या कपट वचातें झाला सिद्धचि कदनातें। अंतरीं जरा शरम हो धरा। नाहिं नय मुळी, मृत्यु तो बरा। वाटतें स्त्रिया, सिद्धताकरा। संगरा चला किमपि नच डरा। कपटानें। सचिवानें। फसवुन आणिलें तुम्हातें॥ १॥

१ शिपाई–अरे पोरा उगीच कां वटवट करितोस ?

२ शिपाई–न्यारे याला आपल्या छावणींत.

( शिपाई जवळ जातो )

पुष्कर–हं खबरदार माझ्या अंगाला हात लावशील तर.

( एक शिपाई हळूच मागून जावून पुष्करास धरतो व त्यास घेऊन जाणार इतक्यांत मंजुभाषिणी पुरुषवेषानें प्रवेश करते).

( पुष्करास सोडतात. )

मंजु०–हं सोडत्याला सोड अरे प्रत्यक्ष राजाचा मुलगा कैद करून नेतां ? ज्याला रानांत वाघानं नेलं होतं तोच हा मुलगा तुमच्या सुदैवानं वांचला. बेशरम कुठचे; हा राजाचा मुलगाच आहे. दुसरा कोणी नाहीं. अरे त्या मांगाच्या वतीनं कां लढतां ? तुमचा राजा अद्याप जिवंत आहे व त्यानेंच ही लढाई सुरूं केली आहे. अरे हा दुष्टः–

पद ( किर्तिवानुंबल )

हा नीच गु..ी भ्रष्ट करीतो. जुलुम वाघ मागे। लागे वेष्टि ति तनुप्रति परतंत्रादिक विष-धागे। तनु डागे। वसु. वेगें। व्हा जागे। निज लागे। निजला कसें ? करुं मुक्त-धार असि कां न करांचा घे ॥ १ ॥

( राम्या दगड्या सटव्य येतात )

पुष्कर—.

धरुनीया धृतिला। त्यजुनी भीतीला। समरिंचला परिभवा रिपूला नगगा मुळिं मृतिला। दाला करवाला। सगळे। बरच्या शस्त्रें घ्या करिं शौर्या दाखवुं शत्रूला। त्रस्तकरा रिपुला। समरीं। धरणी धर अभिमान धरा मानिं समरीं जावुंचला। ईश्वर पद कमला। स्मरुनी। समरीं अपणा देइल जय तो अंतरिं शीघ्र चला ॥ १ ॥

( पडद्रा पडतो )

---

## प्रवेश पांचवा.

स्थळ—( अरण्य. )

( पुष्पावती एकटीच प्रवेश करिते )

पद ( हें काय बरें त्वां. )

ममकांत न कां भेटे मजला ॥ धृ ॥ आजवरी मी बहुताचि फिरलें । सौख्य जगीं या मजसीं नुरलें । मी पापिणि कां आतां जगलें ? । मम स्वांत धरीना धीराला ॥ १ ॥

किती हाल सोसूं ? त्यांच्या मरणाची बातमी खरीतर नसेल का ? हायरे दैवा ती जर खरी असेल तर काय करायचं मला जगून ! मला कशाला पाहिजे या जिवाचा घोर.

पद ( राम करीं जरि. )

कांताविण प्रमदेतें जगुनी । काय करायाचें या भुवनीं । असेल जिवलग ज्या त्या स्थानीं । जावें युवतीनें ॥ १ ॥ दैवत हें पति सर्व स्त्रियांनीं । सेवावें त्या ऐसें मानुनि । मानिति ज्या त्या सुरपति-भुवनीं । जातिल आनंदें ॥ २ ॥

किती शोध करावयाचा ? आजपर्यंत थोडाकां शोध केला. ? आतां करते मी आपला हा देह अग्नि नारायणाला अर्पण. ( जाते. )

( हंसराज, पुष्पसेन, गोसावी वेषाने; व सदानंद एका बाजूने प्रवेश करितात. ) व ( दुसऱ्या बाजूनें पुरुष वेषानें मंजुभाषिणी प्रवेश करते. )

**सदानंद**--कायहो, ही लढाई कोणकोणामध्यें चालली आहे ह्मणता ?

**मंजु** –वीरबाहू आणि खलराय या दोघांमध्यें ; तुह्माला माहित असेल ऐकून कीं जयपूरच्या राजाचा पत्ता नसल्याकारणानें खलराय राज्यकारभार चालवीत आहे खलरायानें वीरबाहू नामक सरदारास कैदेंत टाकलें होतें. तो तेथून सुटून ही लढाई त्यानें आरंभिली आहे.

**पुष्पसेनः**–कायरेही तुझी स्थिती ? वीरबाहू.! परमेश्वर तुला यश देवो. कायहो तुह्मी कोणत्या पक्षाचे आहांत.

**मंजु०**–मी वीरबाहूच्या पक्षाचा आहे.

**पुष्पसेन**–तुह्मी जयपुरास असतां किंवा दुसरे कोणीकडे

**मंजु०**–मी नेहमीं जयपुरास असतों.

**पुष्पसेन**–मग तुह्मी मला ओळखीत नाहीं. ?

( गोसावी वेषाची वस्त्रें टाकतो. ) ,

**मंजु०**–( पाया पडते ) महाराज ज्याप्रमाणं आपण राजे पुष्पसेन असून कृत्रिम गोसावी झालांत त्याचप्रमाणे आपल्या एकनिष्ट वीरबाहू सेवकांची ही अर्धांगी (पुरुष वेष टाकते) महाराज या खलरायानं कपट करून

सर्व फितुरी चालविली होती पण ती आपल्याच पुत्रानं मोडून सर्वांना उपदेश करून लढाईला उत्तेजन दिलं. महाराज काय आपल्या पुत्राचे गुण सांगूं.

सदानंद–शाबास ! पुष्करा शाबास ! ! पुष्कर बाळ कोठें आहे बरं !

मंजु–बहुतेक तो लौकरच इकडे परत येईल.

( अग्नी प्रदीप्त केला आहे समोर पुष्पावती उभी आहे असा पडदा उघडतो. )

सदानंद–तर मग चला त्याला भेटायला जावूं. [ मागें पाहून ] हें काय लचांड आहे ?

पद ( पोरासह थोर. )

शचिकांता हे वरुणा । पवना पशुपा शमना । मार्तंडा करि नमना । दासि ही पदा ॥ १ ॥ कश्यपादि मुनिवरास साध्वी । सीतादिकांस । अंबे वन–देवतांस । सकल पूर्वजा ॥ २ ॥

( हातांत फुलांची माळ घेतें )

पद ( काय मला भूल )

अर्पण ही दाम तुला हो हुताशना । वाहते तनू तुला करुनि वंदना ॥ ध्रु ॥ सत्पकरा अनला ही नेइं तां-

तडी । पति वसाति स्थानाला दून मम कुडी। किला ही नेवुं मला स्वर्गी धडफुडीं । वन देवी दासि करी चरम वंदना ॥ १ ॥

( पुष्पावती उडी टाकणार इतक्यांत मंजुभाषिणी जाबून तिचा हात धरिते. )

पद ( फार दिलें हो. )

आत्मवध असा । करिसि । सखये कां देइं धिसा कांहिं मानसा । अंत नच रसा । गडे । पाहि कांत शिणवि तनुस श्रांत नच अशा । प्रेम पूर्णशा । होइं । अंतिं सुखद, खंति न करि सु-समयीं अशा ॥ १ ॥

पुष्पावती–त्यांनाच पहायला जातेंना.

मंजु०–पुष्पावती बघ, मागं वळून बघ कोण आहेतें.

( राजा पुष्पसेन व पुष्पावती भेटतात )

पुष्पसेन–प्रिये आपला बाल जिवंत आहे.

मंजु०–तो पहा इकडेच येत आहे.

पुष्पावती–मी स्वप्न तर नाहींना हें पहात ! मोठाच आनंदाचा दिवस.

सदानंद–राजा तो पहा तुझा एकनिष्ट सेवक वीरबाहू व तुझा मुलगा पुष्कर इकडे येत आहे.

( वीरबाहू, व पुष्कर खलरायास बांधला आहे असा घेऊन येतात. )

**पुष्कर**–गुरुमहाराज मी आपणाला वंदन करितों.

**वीरबाहू**–सदानंद स्वामीमहाराज मीहि आपणाला वंदन करितो. हा आपल्या महाराजाचा मुलगा.

**सदानंद**–माझा शिष्य.

**हंसराज**–आणि माझा स्वामी.

**मंजु**–पुष्पावती हाच तुझा लाडका बरं. वाघाच्या तोंडातून याला गुरुजीनीं सोडवलं. आजपर्यंत याचं पालन गुरुजीनीं केलं आणि त्यांनीं त्याचं नांव पुष्कर असं ठेवलं आहे. तेंच नांव आतां तुह्मी ठेवा.

( पुष्पावती पुष्करास जवळ घेते. )

**खलराय**– ( वीरबाहू पुढें पदर पसरून ).

पद ( शांतिधरा नृपराज )

वंदि पदा मानिं दास । कोपा, राहुं न द्या खलखास । योग्य असे दंडास ॥ ध्रु ॥ पादिं या शरण असे । थार जगतिं या नसे । कामें होवुनि अंध खलानें गांजियलें तुह्मास ॥ १ ॥ अनुताप होत असे । देहांताचि दंड रसें । भोगिन शस्त्रें या समयासी मारा या अधमास ॥ २ ॥

**वीरबाहू**—

पद ( फिरवि वदन वचन )

शरम तुज न कपटि अधम जगतिं तुज समान ॥ ध्रु ॥ कोणि नर नसेच जाण । नच तव पयधर समान स-

मल वदन आण ॥ १ ॥ वसुमदेंच मत्त होसि गणि-
सि न लव नृप-दरासि । छळिसि नगरिं योषितांसि ।
बहुत तदिय समल वदन मजसमोर नाण ॥ २ ॥

( खलराय सर्वांच्या पुढें पदर पसरून पाया पडतो )

खलराय— ( पश्चात्ताप पावून )

पद ( सुमंत्रिमंडल सार्वभौमिनी )

केला अतिक्रम या अधमानें । नीचपणानें अविचा-
रानें । लंपट होवुनि स्त्री-प्रेमानें । मत्त होवुनी वित्त
मदानें ॥ धृ ॥
रसनेनें हो दोष न कथणें । तनु भरली ही कापट्यानें।
नृप उपकृतितें कुलाधमानें । विसरुनि जाऊन या
भणगानें । दुःखदिलें सकला अधमानें ॥ १ ॥

बाळा पुष्करा याला क्षमा कर.

पुष्कर—खलराय तुमच्या सर्व कृतीचा तुम्हाला पूर्ण प-
श्चाताप झाला आहे हें बस आहे. हीच क्षमा स-
मजा. सर्व लोकांनीं आजपासून या प्रधानाचें उदाहरण
रात्रंदिवस डोळ्यापुढं ठेवून स्वदेशाभिमानाचें भव्य नि-
शाण आपल्या शरिरावर धारण करून याच्यासारखे जे
अधम चांगल्या राज्याची भव्य इमारत ढांसळूं इच्छित
असतील अथवा दुसऱ्या स्त्रियांच्या पातिवृत्य भांडारा-
वर छापा घालूं पाहत असतील त्यांना त्या भव्य नि-

शाणाच्या दांडक्याखालीं चोपून पार जमिनींत गाडून टाकण्यास कधींही मागें पुढें पाहूं नये. गुरुमहाराज याचे सर्व अपराध माफ व्हावेत अशी माझी इच्छा आहे.

पुष्पावती—मीही तसंच म्हणतें.

मंजु०—महाराजांनीं क्षमा करावी अशी माझीही विनंति आहे.

खलराय—पुष्पावती बाई तुम्ही मला मातोश्री प्रमाणं आहांत. मंजुभाषिणीबाई तुम्ही मला माझ्या वडील बहिणीप्रमाणं आहांत.

( भुजंगराय, पिऱ्या व इतर लोक प्रवेश करितात )

पुष्प—हा पहा भुजंगरायही इकडेच येत आहे.

भुजंगराय—सर्वांना वंदन करितों.

पिऱ्या—मी पिऱ्याबी समध्यास्नी जोहार करतों.

पुष्पसेन—पिऱ्या तूं माझा प्राण दाता आहेस.

पिऱ्या—आमच करतव्य आम्ही केलं. आम्ही आपलं चाकुरचं हाव. ते मंदीं काय—

सदानंद—राजा कर याचे सर्व अपराध याला माफ.

पुष्पसेन—आपली आज्ञा मान्य आहे. प्रधानजी तुमचे सर्व अपराध तुम्हाला माफ आहेत. पश्चाताप हीच

तुह्माला शिक्षा पुरे आहे. तुह्मी पूर्ववत आपलें काम सांभाळा. वीरबाहू तुह्माला-सुभा सेनापतीची जागा देण्यांत आली आहे ती तुम्ही आनंदानं स्वीकारा.

सदानंद-राजा तुझी स्त्री तुला भेटली, तुझा मुलगा भेटला ; तुझे दुर्दिन संपले. सर्वांच्या भेटी होवून हा आनंदाचा दिवस प्राप्त झाला. आणखी तुझी काय इच्छा आहे. ?

पुष्पसेन-गुरुमहाराज आपल्या जवळ काय मागूं ? तरी पण हें असो.

पद ( ध्या बापानो दर्शन. )

कृपा-दृष्टिनें मेत्रराज तो योग्य समयिं पाहो। धर्मनीति सुविचार सत्य हीं जागृत मानिं राहो ॥ धृ ॥
विषय वासना मत्सर-विष हीं पूर्ण लया जावो ।
आलस्यादिरिपूवर्यांत थार न तनु देवो। धर्मनिष्ट गुणि,राज निष्टही सकल प्रजा होवो। शिशु-शीर्षीया वरद हस्त तव नित्य प्रभो राहो ॥ १ ॥

( सदानंद पुष्करास जवळ घेतात )

पुष्कर-ज्याच्या कृपेनं हे जगाचं रहाट गाडगं चाललं व ज्याच्या कृपेनं हा आनंदाचा दिवस आपणास प्राप्त झाला त्या परमेशाचं स्मरण करून नंतर कायतें करूं.

सर्वपात्रें:—

जयश्रुति शिर। मदहर। कलिहर। शिवकर। संकटिं अवन करा। कंजभवादिक। कल्पक तरुवर। सुख-रिपु-कंधर। सद्यवरा। पापनिवारण। करुनी मुनिजन। उध्दरि नतजन। पीत-क्षुरा। विश्व दुरितहर। जोडुनिया कर। स्तविति निरंतर। नारद तुंबर। तवनत किंकर चरणिं धरा॥ १॥

( पडदा पडतो. )

---

## ईश स्तवन.

पद ( शंकरा पामरहा )

वंदना यदुवीरा करि। श्रीवर। कालि-मल-संहारा॥धृ॥
परमानंदा। सत्सुख-कंदा। पातकिं मंदा। कंबुधरा। विद्यागारा। मधु-संहारा। नंद-किशोरा। पदीं धरा। भो मारुति भवधी-मधुनी या तारा रमावरा॥ १॥
उदधिज-कांता। नच आद्यंता। करि द्वैतांता अमरवरा। जगदाधारा। अघपरिहारा। कलुश-विदारा। दुःख हरा। ही कृति प्रिय सकला होवो। दासाशा। पूर्ण करा॥ २॥

**समाप्त.**

